# रातराणीचीं फुलें

गजानन त्र्यंबक माडखोलकर

उषा प्रकाशन, औन्ध

फेब्रुआरी १९४०

आमचे स्नेही

श्री० उमाकान्त

आणि

सौ० स्नेहलताबाई भेंडे

यांस

आदरपूर्वक समर्पण

# माडखोलकरांचीं पुस्तकें

## प्रबंध

[१] आधुनिक कविपंचक
[२] विष्णु कृष्ण चिपळूणकर
[३] विलापिका
[४] वाङ्मय-विलास
[५] स्वैर विचार
[६] माझे आवडते लेखक

## कादंबऱ्या

[१] मुक्तात्मा
[२] भंगलेलें देऊळ
[३] शाप
[४] कांता
[५] दुहेरी-जीवन
[६] मुखवटे
[७] नवे संसार
[८] डाक बंगला

## कथा-संग्रह

[१] शुक्राचें चांदणें
[२] रातराणीचीं फुलें

# भूमिका

माझे तरुण मित्र श्री० वसंतराव सातवळेकर यांनी मोठ्या हौसेने या पुस्तकाच्या प्रकाशनाची जबाबदारी आपल्या अंगावर घेतली; व त्यांच्या शब्दाला मान देण्यासाठीच, स्वतःच्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिणें मला प्रिय नसतांनाही, मी हे चार शब्द आज लिहीत आहें.

मी स्वतःला साहित्यिक किंवा ललित लेखक समजत नाही. साहित्य-निर्मिति आणि कलोपासना या दोन गोष्टी, ज्यांना भरपूर आर्थिक स्वास्थ्य लाभलेलें असतें, त्या सुखवस्तु व्यक्तींनाच खरोखरी करणें शक्य आहे. उप-जीविकेचा दुसरा कोणताहि मार्ग उपलब्ध नसल्यामुळे मी वर्तमानपत्राच्या धंद्यांत पडलों; व त्या धंद्याला केवळ जोड म्हणूनच मी निरनिराळ्या प्रकारचें लेखन गेलीं वीस वर्षे करीत आलों आहे. प्रतिभा, पांडित्य किंवा प्रसाधन यांपैकी कशाचाहि या लेखनाशीं संबंध नाही. वृत्तव्यवसायांत पडलेल्या माणसा-ला, त्याची इच्छा असो वा नसो, रोज अनेक गोष्टी ऐकाव्या, पहाव्या, वाचाव्या आणि लिहाव्याहि लागतात. या परिस्थितींतूनच माझें सारें लिखाण पैदा झालेलें आहे.

अर्थात् प्रस्तुत पुस्तकांत समाविष्ट केलेल्या लेखांना गोष्ट, लघुकथा किंवा शब्दचित्र यांपैकी कोणतें नांव द्यावें, हें मला समजत नाही. ' शुक्राचें चांदणें ' हें अशा प्रकारच्या माझ्या लेखांचें पहिलें पुस्तक जेव्हा दोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालें, तेव्हाहि माझ्या मनांत ही शंका उत्पन्न झालीच होती; व म्हणूनच ' कलाहीन कथांचा संग्रह ' असें नांव मी त्याला स्वतःच देऊन टाकलें. त्या

नांवावर विनोदबुद्धि विशेष तीव्र असलेल्या माझ्या एका मित्राने अशी टीका केली की, " कलाहीन का होईना, पण तुम्ही आपल्या या लिखाणाला ' कथा ' या नांवाने संबोधतां, हेंच मुळी मला अधिक वाटतें. कथावाङ्मयाचा कोणताहि तांत्रिक ( Technician ) या पुस्तकांतील लेखांना ' कलाहीन कथा ' म्हणा-वयालासुद्धा कबूल होणार नाही. कारण त्यांत कला आणि कथा या दोन्हीहि नाहीत ! " मला ही टीका अत्यंत मार्मिक वाटली; व या पुस्तकाच्या नाम-करणाच्या बाबतींत मी मुग्ध राहण्याचें ठरविलें.

पण, आपल्या मुलाला आपण नांव ठेवण्याचें टाळलें, म्हणून लोक नांवें ठेवीत नाहीत असें थोडेंच आहे? माझ्या या लिखाणावर सामान्यतः दोन प्रकारची टीका प्रथमपासूनच होत आली आहे. पैकी टीकेचा एक प्रकार मी वर वर्णन केला तो. या टीकेचें तात्पर्य असें की, हे माझे लेख साहित्यशास्त्रांतल्या कोणत्याही शिष्टसंमत सांचांत बसूं शकत नाहीत. मला स्वतःला हा आक्षेप अर्थातच मान्य आहे. कारण, हे लेख ज्या उद्देशाने मी लिहिले, त्याचा कला किंवा साहित्य यांच्याशीं कांहीसुद्धा संबंध नाही. फ्रेंच कादंबरीकार व्हिक्टर ह्यूगो याचें ' थिंग्ज सीन ' (Things Seen) हें पुस्तक वाचीत असतां, आपल्या अवलोकनांत आलेलीं कांही दृश्यें किंवा प्रसंग वर्णन करावेत, अशी कल्पना माझ्या मनांत आली; व लगेच ' दिलरुबा ' हा लेख लिहून मी तो ' मनो-रंजनां 'त प्रसिद्ध केला. तो लेख लिहितांना कलेच्या जाणिवेपासून माझें मन इतकें कांही दूर होतें की, ' आवडत्या गोष्टी ' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत प्रो० लागू यांनी त्याचा ' उत्कृष्ट कलाकृति ' म्हणून केलेला निर्देश जेव्हा मी पाहिला, तेव्हा मला अतिशय आश्चर्य वाटलें ! त्यानंतर गेल्या पंधरा वर्षांत अशा प्रकारचे जे लेख मी लिहिले, ते लिहितांना हाच एक उद्देश माझ्या डोळ्यांपुढे होता. किंबहुना, ' अजिंक्य ' हा माझा लेख जेव्हा 'सत्यकथे'तून प्रसिद्ध झाला, तेव्हा त्यावर ' घडलेल्या गोष्टी ' असें उपशीर्षक मी घातल्याचें कदाचित् कांही वाचकांना आठवतहि असेल.

व्हिक्टर ह्यूगोचे लोकोत्तर कलागुण जरी या लेखांत नसले, तरी वास्तव-कथनाची जी चाड त्याने ' पाहिलेल्या गोष्टी ' लिहितांना बाळगली असल्याचें

सांगतात, ती चाड मीहि या लेखांत बाळगण्याचा प्रयत्न केला आहे. अर्थात् आपल्या पाहण्यांत किंवा ऐकण्यांत आलेल्या गोष्टी कितीहि खऱ्या असल्या, तरी त्या वर्णन करतांना अनेक बंधनें पाळावीं लागतात. तीं पाळतांना जें कांही थोडेंबहुत गोपन किंवा मिश्रण करावें लागलें असेल, तेवढेंच. प्रस्तुत संग्रहांतील 'दिलरुबा' हा लेख मी गीतावाचस्पति कै० सदाशिवशास्त्री भिडे यांच्या सान्निध्यांत असतांना लिहिला. त्यांत आलेलें व्यक्तिचित्रण बव्हंशीं त्यांचेंच आहे. तो लेख त्यांच्या वाचनांत येईल, असें मला वाटलें नव्हतें. पण तो प्रसिद्ध झाल्यावर पुण्यास आमची गाठ पडली असतां शास्त्रीबुवा एकदम मला म्हणाले, " गजाननराव, तुम्ही ' मनोरंजनां 'त आमच्यावर लिहिलेली गोष्ट वाचली बरं का ! फार सहृदयतेनं लिहिलंय् तुम्ही ! " तथापि, त्या लेखांतील शेवटचा भाग दुसऱ्या एका अंध वादकाच्या हकिकतीवरून मला सुचला होता, हें नमूद करणें अवश्य आहे. पण, या फरकामुळे मूळ व्यक्तिचित्राच्या स्वारस्याला किंवा वास्तवतेला बाध आला नव्हता, हें कै० भिडेशास्त्री यांच्या उद्गारांवरून स्पष्ट होतें. १९३० सालीं नागपूरच्या तुरुंगांत असतांना कर्मवीर बापूजी पाठक यांची अन्नविषयक नियमनांच्या बाबतींत जी झटापट तुरुंगाच्या सुपरिंटेंडंटशीं झाली, तिचें बहुतेक हुबेहूब वर्णन ' अजिंक्य ' या लेखांत केलेलें आहे. असेंच इतरहि बहुतेक लेखांविषयी मला सांगतां येईल.

पण, मौज अशी की, हे लेख नियतकालिकांतून प्रसिद्ध होत असतांनाच ते अतिरंजित किंवा अवास्तव असल्याचा आक्षेप अनेकांनी खाजगी व जाहीर रीतीने घेतला आहे. 'शुक्राचें चांदणें ' हा माझा लेख १९३६ सालीं 'ज्योत्स्ने-' च्या जुलै अंकांतून प्रसिद्ध झाला. तो अंक बाहेर पडल्याबरोबर बडोद्याचे राजकवि कै० चंद्रशेखर यांचें ता० ३--७--३६ रोजीं मला असें पत्र आलें की, " ज्योत्स्नेच्या जुलैच्या अंकांतील आपलें ' शुक्राचें चांदणें ' पाहिलें. तें इतकें सुंदर वाटलें की, तें निर्माण करणाऱ्या लेखकावरून मीठमोहऱ्या उतराव्या, त्याचें लिंबलोण करावें, असेंच वाटलें ! खरोखर सर्वांगसुंदर व नितान्तरमणीयच तो लेख. मात्र त्यांत गुन्हेखान्यांतील शेवटच्या कोठडींतील कैद्यांचें विव्हळणें जर बंदिवान् कथानायकास ऐकूं येत नव्हतें, तर तें त्याने जाणलें कसें ? एवढीच शंका राहते. शक्य असल्यास तिचें समाधान करावें. " श्री० प्रभाकर

पाध्ये यांनी अशी तक्रार केली होती की, त्या लेखांतील शीखाच्या तोंडीं जी अलंकारिक आणि प्रौढ भाषा घातलेली आहे, ती समर्पक वाटत नाही. १९३० सालच्या ऑगस्टमध्ये उमरावतीच्या तुरुंगांत असतांना एका शीख कैदी वॉर्डराने सांगितलेल्या हकिकतीच्या आधाराने तो लेख लिहिलेला आहे. हा शीख इंग्रजी जाणणारा आणि वक्तृत्वसंपन्न होता; व माझ्या कोठडीच्या दाराशीं बसून रात्रीच्या पहिल्या पहाऱ्याच्या वेळीं त्याने आपल्या दुर्दैवाची कहाणी मला सांगितली होती. पण ती सत्यकथा असंभाव्य ठरविणारे किती तरी टीकाकार मला आजवर भेटलेले आहेत.

या असंभवनीयतेच्या आरोपांतूनच असाहि एक ध्वनि पुष्कळदा उमटतो की, मानवी जीवनांतील लोकविलक्षण अशा अपवादात्मक घटना वर्णन करण्याकडे माझ्या मनाचा कल आहे. पण, ज्यांना 'कला' किंवा 'प्रतिभा' या शास्त्रीय नांवांनी संबोधिलें जातें, त्यांची प्रवृत्ति तरी काय निराळी असते ? सामान्यांतील असामान्यत्व हुडकून काढणें, हा प्रतिभेचा स्वभाव आहे; व हें असामान्यत्व चित्रित करण्याची जी हातोटी तिलाच कला म्हणतात. 'मेघदूत' किंवा ' ॲडोनाईस, ' ' मादाम बोव्हारी ' किंवा ' ॲमॉक ' या श्रेष्ठ गणल्या गेलेल्या कलाकृतींत मानवी प्रतिभेचा हाच स्वभाव व्यक्त झालेला नाही काय ? आपलें सामाजिक आणि वैयक्तिक जीवन आज संक्रमणावस्थेंत असून, जीवनाच्या जुन्या आदर्शांचा चुराडा होत आहे व नवे आदर्श घडविण्याचा प्रयत्न चालू आहे. नवें व्यक्तित्व आणि नवें जीवन निर्माण करण्याचे जे हे प्रयोग सध्या सर्वत्र चालू आहेत, त्यांच्या मागची मनोवृत्ति किंवा त्यांचें मर्म उकलून सांगूं लागलें, म्हणजे त्यांचें स्वरूप अपवादात्मक किंवा विकृतहि वाटतें. पण, तें तसें वाटलें म्हणून वर्णन न करून कसें चालेल ? उलट या साऱ्या प्रयोगांची इष्टानिष्टता समाजाच्या निदर्शनाला आणून देण्यासाठी या प्रयोगांचें चित्रण आणि विश्लेषण करणें हें लेखकांचें कर्तव्य ठरतें. 'शुक्राचें चांदणें,' 'आकर्षण,' ' त्याची मुशाफरी, ' ' दोष कोणाचा? ' ' रातराणीचीं फुलें, ' ' डॉ॰ अजित ' वगैरे माझ्या दोन्ही संग्रहांतील लेख याच दृष्टीने लिहिलेले आहेत. नव्या जीवनाचे जे प्रयोग माझ्या पाहण्यांत आले, त्यांचें मर्म माझ्या समजुतीप्रमाणे मी या लेखांतून वर्णन आणि विशद केलें आहे. तें कदाचित् चूक असेल, कदाचित्

बरोबरहि असेल. पण, त्या लेखांतून वर्णन केलेल्या घटना या बऱ्हंशीं वास्तविक असल्यामुळे मार्मिक वाचकाला स्वतःलाहि त्यांतून आपल्या कल्पनेनुसार बोध काढतां येईल.

या दोन आक्षेपांशिवाय आणखीहि एक आक्षेप या लेखांवर, विशेषतः खाजगी पत्रांतून, पुष्कळदा घेतला जातो. तो असा की, या दोन्ही पुस्तकांतल्या कांही लेखांतील वातावरण आधुनिक वाटत नाही. हा आक्षेप मला अमान्य नाही. गेलीं पंधरा वर्षें पाश्चात्य सुधारणेच्या आहारीं अद्याप पूर्णपणें न गेलेल्या या गोंडवनांत मी रहात आहें. या गोंडवनाची आत्मसात् करण्याची शक्ति इतकी कांही विलक्षण आहे की, डॉ॰ राघवेंद्र राव यांच्यासारख्या ब्रिटिश राजनीतीच्या सुसंस्कृत ढंगांत तरबेज असलेल्या मुत्सद्द्यालाहि गृहमंत्रिपदावर असतांना युरोपियन क्लबाला शह देण्यासाठी 'गोंडवन क्लब' काढण्याची इच्छा झाली ! मालगुजारी पद्धत आणि तिच्या आश्रयानें नांदणारें मध्ययुगीन विलासी जीवन या गोंडवनांत अजूनहि शिल्लक राहिलें आहे. तें इतकें की, साम्यवादाचा सावेश पुरस्कार करणाऱ्या नागपुरांतील सोशॅलिस्टांच्या बैठकींतसुद्धा हुक्क्याच्या जरतारी नळीच्या कंठांतून घरंगळणारा गुड्गुड् आवाज ऐकूं येतो. शिवाय, मुस्लिम संस्कृतीची छाप महाराष्ट्राच्या या भागावर जास्त पडलेली असल्यामुळे, येथील जीवनांत ब्राह्मणी कर्मठपणाऐवजीं एकंदरींत उदार असा कलंदरी, मस्त रुबाब अधिक आहे. 'नृत्यांगना,' 'देऊळ आणि दर्गा,' 'पडदानशीन मोटार,' 'पिंपळाचें झाड,' 'शुक्राचें चांदणें,' 'अमीना,' 'वलीसाहेब' वगैरे लेखांतून जें मध्ययुगीन, किंचित् मदिर वातावरण दृष्टीस पडतें, तें याच कारणामुळे. नागपूरचे मुस्लिम संत ताजुद्दिनबाबा यांना पुत्रप्राप्तीसाठी केलेला नवस फेडण्याकरिता एका मातबर पाटलाने हत्तीघोड्यांच्या लवाजम्यानिशी काढलेली अर्धा मैल लांबीची मिरवणूक दहा वर्षांपूर्वी मी स्वतःच्या डोळ्यांनी पाहिली आहे. नापिकी आणि सारावाढ यांच्यामुळे हें मध्ययुगीन, मस्त जीवन आता झपाट्याने लोपत चाललें आहे. त्याच्या कांही अवशेषांचें चित्रण करण्याची संधि मला लाभली, हें मी आपकें सुदैव समजतों.

जीवनाकडे पाहण्याचे अनेक दृष्टिकोन असतात. माझा दृष्टिकोन जिज्ञासे-

चा, सहानुभूतीचा आणि रसिकतेचा आहे. विराट् मानवी जीवनाचें कोणतेंहि अंग, मग तें कितीहि अभद्र किंवा ग्राम्य असेना, मला उपेक्षणीय वाटत नाही; व पूर्णचंद्राच्या सुषमेने न्हालेल्या जगन्नाथपुरीच्या शुभ्र वाळवंटांत मी जितक्या उन्मादाने लोळलों आहे, तितक्याच उल्हासाने ताजुद्दिनबाबाच्या उरुसांतील बकाल जनसंमर्दांतून नाचगाण्याच्या मैफली पहात रात्रभर भटकलों आहे. अशा प्रकारच्या निरंकुश परिभ्रमणांत ज्या गोष्टी मला दिसल्या, माझ्या हृदयाला भिडल्या किंवा माझ्या विचारांना धक्के देत्या झाल्या, त्यांपैकी कांही या लेखांतून मी चित्रित केल्या आहेत. खिशांत रेषाचित्र काढण्याचे सामान किंवा कॅमेरा घेऊन हिंडणारे मुशाफिर एखादें विलक्षण किंवा विलोभनीय दृश्य नजरेस पडतांच लगेच त्याचें चित्र रेखाटून किंवा छायाचित्र घेऊन मोकळे होतात. अशाच कांहीशा भावनेने मी हे लेख लिहिले आहेत. इतक्या सहजा-सहजीं लिहिलेलें हें अहेतुक लिखाण पुरोगामी आहे, तिरोगामी आहे किंवा अधोगामी आहे, हें मी कसें सांगूं? समाजाची प्रगति घडवून आणण्याचा मक्ता आपल्याकडे आहे असें समजावयाला आणि तदनुसार वाङ्मयनिर्मिति करावयाला जें मोठेपणाचें अवसान अंगीं असावें लागतें, तें सुदैवाने माझ्या ठिकाणीं नाही. त्यामुळे एक प्रकारच्या निर्भ्रांत आणि निरंकुश मनाने इच्छेस येईल तें मी लिहूं शकतों.

अर्थात् साहित्यशास्त्रांतल्या कोणत्या साचांत हे लेख बसतात, हें ठरविण्याचेंहि काम माझें नाही. कारण मी विद्वान् नाही आणि कलाकोविद् तर नाहीच नाही. एका उपजीविकावादी लेखकाचें हें त्रुटित निरीक्षण आहे. तें वाचून लोकांची जी काय करमणूक होईल, तेंच मी माझ्या श्रमांचें सार्थक समजतों. मग त्याला कला आणि साहित्य यांत स्थान मिळो वा न मिळो.

२४ जानेवारी १९४०
शांतानिवास, नागपूर

ग० त्र्यं० माडखोलकर

# अनुक्रमणिका


| विषय | | | | पृष्ठाङ्क |
|---|---|---|---|---|
| १ रातराणीचीं फुलें | ... | ... | ... | १ |
| २ सशाचे डोळे | ... | ... | ... | ३० |
| ३ अखेरची इच्छा | ... | ... | ... | ३५ |
| ४ अमीना | ... | ... | ... | ४० |
| ५ प्रचारक | ... | ... | ... | ५० |
| ६ पिंपळाचें झाड | ... | ... | ... | ६० |
| ७ त्याची मुशाफरी | ... | ... | ... | ६६ |
| ८ दिलरुबा | ... | ... | ... | ७४ |
| ९ दोष कोणाचा ? | ... | ... | ... | ८५ |
| १० वलीसाहेब | ... | ... | ... | ९७ |
| ११ डॉ० अजित | ... | ... | ... | १०३ |




१ : : : # रातराणीचीं फुलें

डॉ० अजित यांनी ज्या वेळीं रोग्याच्या खोलींत पाऊल ठेवलें, त्या वेळीं तिथे असें कांही दृश्य आपल्याला पहावयाला मिळेल, अशी त्यांना कल्पना नव्हती·

ते कांही धंदेवाईक डॉक्टर नव्हते; पण मेडिकल कॉलेजांतील आपल्या संशोधनाच्या जोरावर अनेक वर्षे धंदा करणाऱ्या डॉक्टरांनाहि न मिळणारी कीर्ति त्यांनी संपादन केली होती. रोगनिदान आणि शस्त्रक्रिया या दोहोंत त्यांचा हातखंडा होता; व अलिकडे मनोगाहनशास्त्राचा विशेष अभ्यास करून त्यांनी मानसोपचार करावयालाही सुरवात केली होती. त्यामुळे धंदा करण्याची इच्छा नसूनहि, केव्हा केवळ जिज्ञासेने प्रेरित होऊन तर केव्हा कोणाची भीड पडल्याकारणाने, ते मधून मधून रोगी पहावयाला जात.

आजचा प्रकार तशांपैकीच होता. आपल्या एका डॉक्टर मित्राच्या आग्रहामुळे ते तिथे आले होते. काल रात्रीं त्यांच्या मित्राने त्यांना ती केस समजावून दिली होती; व आज सकाळीं, आपल्या स्वतःच्या मोटारींत घालून, शहरापासून सात आठ मैलांवर असलेल्या ‘ राधाकुंजा ’ त तो त्यांना घेऊन आला होता.

मोटार बंगल्याच्या कमानीखाली जाऊन उभी राहतांच चपराशाने धावतच पुढे येऊन तिचें दार उघडलें; व ते दोघे डॉक्टर भरभरा पायऱ्या चढून वर आले. त्याबरोबर व्हरांड्यांतल्या वेताच्या खुर्चीवर बसलेल्या वयस्क गृहस्थांनी पुढे येऊन त्यांचें स्वागत केलें—

" गुड मॉर्निंग डॉ॰ कमलाकर— "

" — गुड मॉर्निंग. हे माझे मित्र डॉ॰ अजित; हे रायबहादुर राधाकिसन — "

" आपली ओळख होण्याचा योग आल्याबद्दल मला फार आनंद होत आहे. मी आपल्या कौशल्याविषयी पुष्कळ गोष्टी आतापर्यंत ऐकत आलों होतों— "

" —त्यांत कितपत तथ्य आहे हें प्रत्यक्षच अनुभवाला येईल आपल्या आता ! " तें औपचारिक संभाषण थांबविण्याच्या उद्देशाने डॉ॰ अजित एकदम मध्येच म्हणाले.

" मग रोग्याच्या खोलीकडेच जाऊं या आता आपण ?" डॉ॰ कमलाकर यांनी त्यांचा तो उद्देश ओळखून म्हटलें.

रायबहादुर त्या दोघां डॉक्टरांना घेऊन रोग्याच्या खोलीकडे गेले.

त्या खोलींत खिडकीसमोर ठेवलेल्या कोचावर एक तरुण स्त्री बसली होती. रोगट माणसाच्या चेहऱ्यावरील हास्याप्रमाणे धुरकट, फिकें दिसणारें हिवाळ्यांतील ऊन तिच्या अंगावर पडलें होतें; व त्या उन्हांत तिच्या पातळाचा फिकट जांभळा रंग जवसाच्या नुकत्याच फुललेल्या शेताला लाजवीत होता.

" सुमन— "

—रायबहादुरांनी हळूच हांक मारली.

त्याबरोबर खांद्यांवर घसरून पडलेला पदर डोक्यावर घेऊन ती स्त्री लगबगीने उभी राहिली व तिने मागे वळून पाहिलें. मात्र ती ज्या विचारांत या वेळीं गढलेली होती, त्यांची तंद्रा तिच्या डोळ्यांवर अद्याप कायमच होती. जणु कांही कसल्या तरी गाढ स्वप्नांतून दचकून जागी झाली होती ती !

" हे आपली प्रकृति पहायला आले आहेत, " डॉ० कमलाकर यांनी किंचित् अदबीने म्हटलें.

" गेले दोन दिवस तुम्ही ज्यांच्याविषयी मला इतकं सांगत होतां तेच हे डॉ० अजित ?—पण मी कांही तशी आजारी नाही हें लक्षांत आलंच असेल तुमच्या डॉक्टरसाहेब, मला बघितल्याबरोबर ! आताच आम्ही बॅडमिंटन खेळून परत आलों; न् आता उरलेला दिवस कसा घालवायचा याच फिकिरींत होतें मी— "

तिने अगदी शुद्ध मराठींत म्हटलें.

आणि तिचें तें म्हणणें कांही खोटें नव्हतें.

रोगटपणाचें कोणतेंहि चिन्ह तिच्या शरिरावर दिसत नव्हतें. तिच्या चेहऱ्यावर एक प्रकारची पांडुरता आली होती, ही गोष्ट खरी; पण भीतीने माणसाच्या चेहऱ्यावर ज्या प्रकारची विवर्णता येते, तशा प्रकारचा फटफटीत-पणा होता तो. तिची गोंडस, आरक्तगौर शरीरयष्टि पाहिल्यावर त्या पांडुरते-चा संबंध रक्तहीनतेशीं जोडणें कोणालाहि योग्य वाटलें नसतें. नाही म्हणाव-याला तिच्या डोळ्यांभोवतीं मात्र काळींभोर खळीं पडलीं होतीं आणि त्याहि-पेक्षा विशेष गोष्ट ही की, तिच्या विशाल नेत्रांतलीं बुबुळें केव्हा केव्हा मध्येच तरंगल्यासारखीं वाटत व त्यांत एक प्रकारची शून्यपणाची झाक मारीत असे.

डॉ० अजित यांनी एकवार तिच्याकडे निरखून पाहिलें व नंतर म्हटलें, " मग आपल्याला फिट्स् येत असल्याचं जें यांनी मला सांगितलं, तें खरं नाही तर ? —"

त्याबरोबर ती किंचित् गोंधळली आणि लगेच हसून म्हणाली," त्या तर गेलीं तीन वर्षं येताहेत ! – त्यांची आता इतकी सवय झाली आहे मला की, मी कांही दुखणं म्हणायला तयार नाही त्यांना—"

" आणि केव्हा केव्हा मध्यरात्रीच्या सुमारास श्वास कोंडून जीवहि गुदमरतो तुमचा ? "

" होय, पण तोहि त्या फिट्सचाच एक भाऊबंद आहे–"

" तें मग ठरवूं आपण. पण श्वास कोंडला जाण्यापूर्वी तुम्हांला स्वप्न पडतं का कसलं ? अगदी दुःखदायक असं ?—"

ती क्षणभर घोटाळली.

पण लगेच तिने हसून म्हटलें, " मला डॉक्टरपेक्षा वकिलाशीं बोलत असल्यासारखं वाटूं लागलं आहे आता—"

" बरं, तुमची इच्छा नसेल तर नका सांगूं आज ! त्यांवाचून कांही अडायचं नाही माझं ! पण विशेषतः अशा प्रकारच्या दुखण्यांत रोग्याची पूर्व-स्थिति कळणं जरूर असतं, म्हणून विचारलं मी तुम्हांला—"

" होय. स्वप्न पडतं, पण नेहमीच पडतं असं मात्र नाही—"

" पण केव्हा केव्हा जें पडतं, तें कशा प्रकारचं असतं ? त्यांतल्या एखाद्या घटनेनं छाती भरून यावी असं असतं का तें ?—"

" तसं नक्की कांही सांगतां येणार नाही मला—"

" अगदी थोडीसुद्धा कल्पना देतां येणार नाही ?"

" नाही—"

डॉ० अजित यांनी क्षणार्ध तिच्या दृष्टीला आपली दृष्टि भिडवली. मनाला होणाऱ्या कसल्या तरी दारुण वेदनांची कणव तिच्या डोळयांत ओथंब-लेली त्यांना दिसली व ते म्हणाले—

" ठीक ! मला वाटतं जाऊं या आता आपण. मी पुन्हा उद्या येईन भेटायला आपल्याला—"

आणि रायबहादुरांशीं थोडेंसें औपचारिक बोलून ते दोघे मोटारींत बसले.

मोटार बगीचांतून बाहेर पडून रस्त्याला लागतांच डॉ० अजित म्हणाले, " ही तर अस्सल महाराष्ट्रीय बाई दिसते रे कमलाकर ! आपल्या दक्षिणी ब्राह्मणांपैकीं असावी- "

" होय. तिचं पूर्वीचं नांव सुमन भिडे- "

" तूं हें सांगितलं नाहीस मला पूर्वी. हिचं या रायबहादुरांशीं कसं

काय लग्न जुळून आलं ?-"

" तें मलाही माहीत नाही नीटसं ! मी असं ऐकलंय् की, एम्. ए. झाल्यावर तिनं मीरतला मास्तरणीची नोकरी धरली. तिथं असतांना मीरत कटांतल्या एका महाराष्ट्रीय आरोपीशीं तिचा बराच संबंध आला. तिचं त्याच्यावर प्रेमहि जडलं होतं म्हणतात. पण पुढं कांही तरी त्यांचं बिनसलं न् त्याला शिक्षा झाल्यावर ती मीरत सोडून जबलपूरला आली-"

" आणि त्या प्रेमभंगामुळं महाराष्ट्रीयाशीं लग्न करायचं नाही, अशी प्रतिज्ञा करून तिनं त्या आरोपीशीं कोणत्याच बाबतींत साम्य नसलेल्या या वृद्ध रायबहादुरांशीं लग्न केलं वाटतं ?—"

" अरे, आपल्याला ज्या गोष्टी नीट माहीत नाहीत, त्यांच्याविषयी उगाच कुत्सितपणानं कां बोलावं ? हे रायबहादुर एज्युकेशनल इन्स्पेक्टर होते जबलपूर भागांत त्या वेळीं-"

" समजलों मी पुढचं सारं ! नाही तरी अलिकडे आमच्या पदवीधर तरुणींनी असलीं श्रीमान् कुळं गांठून त्यांच्याशीं लग्नगाठ बांधण्याचा धडाका सुरू केलाय्- "

" तुझ्यासारखे तरुण जर तिशी उलटून गेली तरी बाशिंग बांधायला तयार होत नाहीत, तर त्यांनी तरी काय करावं ?-"

" मला माहीत आहे तुझं औदाक्षिण्य ! बाकी ही केस मात्र मोठी मनोरंजक आहे—"

" मनोरंजक कोणत्या अर्थानं ? " डॉ० कमलाकर यांनी डॉ० अजित यांना खोचून विचारलें.

" मनोरंजक रोगाच्या दृष्टीनं; स्त्री म्हणून खास नव्हे !- "

" काय रे ! तिला पाहून तुला खरोखरीच कांही विशेष वाटलं नाही?"

" काय वाटायचं आहे बुवा ! माणसासारखं माणूस ! आपण रोग्याला पहायला जातों, ते त्याच्या सौंदर्याकरितां होय ?-भले डॉक्टर ! "

तें वाक्य उच्चारून डॉक्टर अजित किंचित् तुच्छतेने हसले.

त्यावर डॉ० कमलाकर वरमून म्हणाले, " मग तूं ही केस घेतली आहेस असं समजूं ना मी ? "

" मला हरकत नाही दिसत तसं समजायला ! "

—२—

दुसऱ्या दिवशीं सकाळीं डॉ० अजित डॉ० कमलाकर यांच्याबरोबर 'राधाकुंजां' त आले, त्या वेळीं सुमन बॅडमिंटन कोर्टावरच होती; म्हणून चपराश्याने त्यांना तेथेच नेलें.

त्या ठिकाणीं वेताच्या सुबक टेबलाभोंवतीं चार पांच खुर्च्या मांडलेल्या होत्या व मंडळींचें चहापान चाललें होतें.

ते दोघे जवळ येतांच रायबहादुर पुढे येऊन म्हणाले, "यावं यावं डॉक्टरसाहेब ! मी आपल्याला इकडं बोलावलं म्हणून गैर तर वाटलं नाही ना ? –मी आपल्याकडे मुख्यतः आमचे स्नेही म्हणून पाहतों,– डॉक्टर म्हणून नव्हे ! आपण चहा घ्याल ना थोडा ?"

आणि ते तिघेहि टेबलाजवळ आले. डॉ० अजित यांचें लक्ष रायबहादुरांच्या बोलण्यापेक्षा सुमनसमोर बसलेल्या नवीन स्त्रीकडे होतें.

ते दोघे बसल्याबरोबर रायबहादुर चहा ओतीत म्हणाले, " या मिस् मार्गारेट कदम; – असिस्टंट इन्स्पेक्ट्रेस आहेत या. हे डॉक्टर अजित– "

त्या दुसऱ्या स्त्रीनें स्मितपूर्वक डॉक्टरांना नमस्कार केला. तिचा काळासांवळा रंग, स्थूलतेकडे झुकणारें सुगोल शरीर, हसतांना किंचित् विलगलेले जाड ओठ व कपाळाच्या मानाने मोठे वाटणारे चंचल डोळे!– डॉक्टर अजित यांनी संथपणाने तिच्याकडे पहात तिला नमस्कार केला.

कांही क्षण अगदी निःस्तब्धता होती.

तिचा भंग करण्यासाठीच कीं काय, मार्गारेट म्हणाली, " आपला लौकिक पुष्कळ दिवसापासून ऐकत होतें मी.— पण भेटीचा योग मात्र आज आला. काय ठरवलंय् तुम्ही दुखण्याचं निदान सुमनबाईंच्या ? "

" अद्याप त्याचं स्वरूपच कळलं नाही मला पुरतं ! या तर म्हणतात मला कांही होत नाही म्हणून— "

" खरंच आहे तें– " इतका वेळ मुग्ध असलेल्या सुमनने डॉक्टरांकडे पहात म्हटलें. " मला आता कांहीच वाटेनासं झालंय् फिट्सचं.-- माझ्या लग्नाला जितकीं वर्षं झालीं तितकींच त्यांनाहि झालीं आहेत !–"

"म्हणजे लग्नामुळं या फिट्स् तुम्हांला यायला लागल्या असं सम-जायचं का ? "

"छे, छे ! तसा अर्थ नाही कांही माझ्या बोलण्याचा. मला फक्त एवढंच सांगायचं होतं की, दुखणं माझ्या आता सवयीचं झालंय् न् माझ्या शरिरावर त्याचा कांहीहि परिणाम होत नाही–"

" शरिरावर नसेल; पण मनावर तरी खात्रीनं होतो ! ही तास न् तास आपल्या त्या खोलींत एकटी अरामखुर्चीवर विचार करीत पडलेली असते ! " रायबहादुर मध्येच म्हणाले.

" खरंच, यांची खोली पहायची आहे मला एकदा ! कांही हरकत नाही ना आपली त्याला ?" डॉ० अजित यांनी आठवल्यासारखें करून म्हटलें.

" हरकत काय असणार ? वाटल्यास सगळा बंगला न् बगिचासुद्धा पाहून घ्या एकदा हवा तर ! माझी इच्छा एवढीच आहे की, हिच्या या फिट्स् कसंहि करून थांबाव्यात—"

" मला कांही भुताबितानं झपाटलंय् असं तर वाटत नाही ना तुम्हांला ?" सुमनने हंसून डॉक्टरांकडे पहात म्हटलें.

" तें आज कसं सांगणार ? " डॉ० अजित यांनी उत्तर दिलें; व ते लगेच रायबहादुरांना म्हणाले, " मग चला तर आताच पाहून घेऊं या यांची खोली न् बगीचा ! "

डॉक्टर बोलतां बोलतां उठून उभे राहिले.

त्याबरोबर सुमन आणि मार्गारेट याहि उठल्या.

" छे, छे ! तुम्हांला उठण्याचं कांही कारण नाही ! आम्ही दोघे राय-

बहादुरांबरोबर जाऊन बंगल्याभोवती चक्कर मारून येतों–"

आणि लगेच डॉ० अजित चालावयाला लागले.

सुमनची खोली आधुनिक पद्धतीने उत्तम सजविलेली होती. खोलीच्य मध्यभागीं ठेवलेल्या सुंदर, काळ्याभोर टेबलावर एका तरुण पुरुषाच्या फक्त मस्तकाचा फोटो ( head-study ) ठेवलेला होता; व मध्येच खूण घातलेलें 'मॅन् अँड वुमन्' हें पुस्तक जवळ पडलेलें होतें आणि त्या टेबलावरील पुष्पपात्रांतच केवळ नव्हे, तर खोलींतील तीन खिडक्यांतूनहि रातराणीच्या फुलांचे कोमेजलेले गुच्छ दिसत होते.

डॉक्टरांनी एक वेळ शोधक दृष्टीने त्या खोलींत चौफेर पाहिलें व नंतर रायबहादुरांकडे वळून ते म्हणाले, "त्यांना फिट्स् यायला लागल्यावर बदलून पाहिली होती का तुम्ही कधी खोली त्यांची ?"

"छे छे ! नांव काढूं नका तुम्ही त्या गोष्टीचं ! लग्न झाल्यावर आम्ही तीन महिने पचमढीला होतों. त्यानंतर इथं आल्यावर सबंध बंगला पाहून तिनं ही एकीकडची खोली पसंत केली; न् तींत साऱ्या सोई आपल्या मनासारख्या करून घेतल्या. तेव्हापासून या एकाच खोलींत गेलीं तीन वर्षं काढलीं आहेत तिनं! – इथं सापांचा उपद्रव फार होतो; म्हणून मी तिला किती तरी वेळा म्हटलं वरच्या मजल्यावरल्या खोलींत तूं आपली स्टडी ने म्हणून— "

"सापांचा उपद्रव कां होतो ? "

"त्यालाहि कारण तिचा एक नादच आहे ! ही खोली निवडल्यावर तिनं प्रथम जर कोणती गोष्ट केली असेल, तर ती ही की, तिन्ही खिडक्यांखाली रातराणीचीं झाडं लावलीं. इतकंच नव्हे, तर बागेच्या या बाजूला सारी तींच झाडं लावून तिनं रातराणीचं बनच केलं आहे तयार एक प्रकारचं त्यामुळं खोलीजवळ साप वारंवार निघतात न् या झाडांना बहर आला म्हणजे फिट्सहि येतात तिला जास्त– "

"आणि तरीसुद्धा हीं झाडं तोडून टाकलीं नाहीत तुम्ही ?—"

" कशी तोडणार ? तिनं परवानगी दिली पाहिजे ना ? तुम्ही पहा वाट-ल्यास तिला विचारून उद्या--"

" होय. उद्या बोललंच पाहिजे मला त्यांच्याशीं--"

डॉक्टरांनी तें वाक्य अशा रीतीने उच्चारलें की, जणु कांही ते स्वतः-शींच बोलत होते. नंतर एकदम ते रायबहादुरांना म्हणाले, "जाऊं या आता आपण कोर्टावर ! झालं माझं पाहून सारं कांही—"

ते कोर्टावर येतांच सुमनने विचारलें, " काय दिसलं माझ्या खोलींत तुम्हांला ? आजपर्यंत कोणत्याहि डॉक्टरला माझी खोली पाहण्याची शक्कल सुचली नव्हती—"

" आणि म्हणूनच त्यांना तुमचं दुखणं बरं करतां आलं नाही—"

" म्हणजे तुम्ही माझी खोली पाहून माझ्या दुखण्याचं निदान करणार?"

" तें मी आज कांहीच सांगत नाही तुम्हांला. —मग चलतों आता आम्ही. उद्या याच वेळीं भेटेन मी तुम्हांला तुमच्या खोलींत—"

आणि ते दोघे मोटारींत जाऊन बसले.

मोटार चालू झाल्यावर डॉ० अजित यांनी डॉ० कमलाकर यांना विचारलें, " काय रे, ही मार्गारेट बरीच येते का रायबहादुरांकडे ? "

" हो. या चार महिन्यांत तरी पुष्कळ येतांना दिसते आहे खरी. "

" सुमनबाईला आवडतं तिचं येणं ? "

" तें कसं सांगणार ? पण बाह्यतः तरी चांगले दिसतात संबंध त्या दोघींचे ! बाकी रायबहादुरांकडे नेहमीच कोणा ना कोणा तरी बाईचं येणं असतं. गेल्या दीड वर्षांत ही चवथी बाई पाहतों आहे मी ! "

" सुमनबाईला आवडतो हा प्रकार ? "

" मला कळत नाही तिची काय मनोवृत्ति आहे ती ! पुष्कळदा मी पाहि-लंय्, रायबहादुर आपल्या एखाद्या मैत्रिणीबरोबर खेळत असतात किंवा फिरा-यला जातात व ही आपल्या खोलींत वाचीत किंवा विचार करीत पडलेली

असते ! मग उद्या मी येऊं कीं नको तुझ्याबरोबर ?—"

"का बरं ?"

"उद्या तूं तिच्याशीं बोलणार आहेस ना ?"

"होय. प्रयत्न करून पाहणार आहे तिच्या मनाचा कांही थांग लागतो का !—"

"बाकी तुझं मन फार लागलेलं दिसतंय् या केसकडे, अजित--"

"होय. मला तिच्या दुखण्याविषयी जितकी जिज्ञासा वाटते, तितकीच तिच्याविषयी अनुकंपा वाटते--"

"अनुकंपा कीं अनुराग ?"

"अनुराग ? छे, छे ! अनुकंपाच ! मला कांही तिच्या मनःस्थितीचा उमज पडलेला नाही अद्याप पुरता. पण तिच्याकडे बघितल्याबरोबर वाटतं तिच्या जीवनाचा कोंडमारा चाललाय् आंतल्या आंत-- "

"स्त्रीविषयी इतकी अनुकंपा वाटण्याचा पहिलाच प्रसंग आहे हा तुझ्या आयुष्यांतला, नाही ? मला आठवतं, कॉलेजांत असतांना तूं पक्का स्त्रीद्वेष्टा होतास. नर्सेस्‌बरोबर फाजील सलगी ठेवणाऱ्या माझ्यासारख्या विद्यार्थ्यांविषयी तिट-कारा वाटत असे तुला ! आणि कॉलेजच्या आवारांतील झाडांखालून रात्रींच्या वेळीं कुजबुजणारीं जोडपीं पाहिलीं, म्हणजे कपाळाची तिडीक उठत असे तुझ्या! स्त्री ही निव्वळ एक boilogical necessity आहे, असं म्हणत होतास तूं अगदी परवापर्यंत-- "

"अजूनहि माझं तेंच मत कायम आहे, कमलाकर ! एखाद्या स्त्रीविषयी अनुकंपा वाटणं म्हणजे तिच्यावर प्रेम जडणं नव्हे."

"पण पुष्कळदा अनुकंपेचं रूपांतर अनुरागांत इतक्या झपाट्यानं होतं की, आपलं आपल्यालाच कळत नाही हा चमत्कार कसा घडून आला तें—"

"मी मानसशास्त्राचा विद्यार्थी आहे हें विसरूं नकोस तूं ! माझं मन फसवूं शकणार नाही मला कधी—"

"तूं जरी मानसशास्त्रज्ञ असलास तरी सगळ्या गोष्टींचा भौतिक दृष्टीनं विचार करणारा आहेस. बुद्धीला न कळत अन् तिला न कळणारे असे जे अगोचर भावनांचे चोरटे चाळे चाललेले असतात, ते लक्ष्यांत यायचे नाहीत तुझ्यासारख्या अभ्यासजडाच्या! माझं मात्र आता रोगी न् डॉक्टर या दोघां-च्याहि मनःस्थितीकडे लक्ष लागून राहणार आहे—"

—३—

डॉ० अजित जेव्हा सकाळीं एकटेच आले, तेव्हा बॅडमिंटनचा खेळ चालू होता व रायबहादूर मार्गारेटबरोबर खेळत होते.

डॉक्टर आलेले दृष्टीस पडतांच रायबहादुरांनी खेळ थांबविला आणि ते अभिवादनपूर्वक म्हणाले, " आज तुम्हांला यांच्याबरोबर बोलायचंय् ना? तुमची हरकत नसेल, तर तुमचं बोलणं होईपर्यंत आम्ही आपला लव्हगेम् पुरा करूं ! "

" ठीक आहे. तुमचा खेळ चालूं द्या. " डॉ० अजित रायबहादुरांना म्हणाले; व सुमनकडे वळून त्यांनी विचारलें—

" आपण खोलींतच बसूं या तुमच्या ?—"

आणि तीं दोघें सुमनच्या खोलींत आलीं.

खुर्चीवर बसल्यावर डॉ० अजित तिच्याकडे पहात इंग्रजींत म्हणाले, " माझा न् तुमचा परिचय होऊन अवघे दोनच दिवस झाले आहेत; पण तुम्हांला मी एक विनंती करणार आहें. यापुढे तुम्ही जें माझ्याशीं बोलणार तें एक स्नेही म्हणून बोला, डॉक्टर म्हणून नव्हे—"

त्याबरोबर सुमनने त्यांच्याकडे न पाहतांच हसून इंग्रजींतच म्हटलें, " तुमची विनंती ठीकच आहे. पण तुमच्यासमोर असलं, म्हणजे मला एखाद्या प्रभावी शक्तीसमोर आपण आहोंत असं वाटत असतं सारखं—"

" म्हणजे मी काय इतका भीतिदायक, इतका अनिष्ट मनुष्य आहे ? "

" मी तुम्हाला प्रभावी शक्ति म्हटलं, अनिष्ट मनुष्य नव्हे—"

" आज रायबहादुरांना मी एक सूचना करणार आहे तुमच्या परवानगीनं ! "

" कसली ? "

" तुमच्या खोलीभोवतालचीं सारीं रातराणीचीं झाडं तोडून टाकण्याची!"

" तीं काय म्हणून ? माझ्या प्रकृतीशीं काय संबंध आहे त्या बिचाऱ्या झाडांचा ? "

" मग तीं तोडून टाकायला तरी कां हरकत असावी तुमची ? "

" अगदीं साधं-सरळ कारण आहे. माझ्या हातांनी मी तीं लावलीं आहेत,-त्यांचीं फुलं मला फार आवडतात—"

" तुम्हांला ज्या प्रकारचं दुखणं आहे, त्या प्रकारचं दुखणं असणाराला रातराणीच्या फुलांचा वास अपायकारक आहे— "

" त्या फुलांपासून मला कांहीहि अपाय झाला तरी चालेल; पण तोडायचीं नाहीत तीं झाडं— "

" पण मी कालच सांगितलं रायबहादुरांना तीं तोडून टाकण्याविषयी न् तें त्यांनी कबूलहि केलंय्— "

" कधीं नाही कबूल करणार ते ! त्यांना माहीत आहे मला तीं झाडं किती आवडतात तें— "

" तुम्ही तीं लावलींत एवढंच कारण आहे का तुम्हाला तीं झाडं आवडायला ? तुमचा स्नेही म्हणून तुम्हांला विचारतों मी सुमनबाई ! मला वाटतं या झाडांचा-रातराणीच्या फुलांचा तुमच्या आयुष्याशीं कांही तरी जिव्हाळ्याचा संबन्ध आहे. खरं ना मी म्हणतों तें ? "

" होय. खरं आहे तुमचं म्हणणं डॉक्टरसाहेब ! रात्रीच्या वेळीं रातराणीचीं फुलं उमलून त्यांचा सुवास माझ्या खोलींत पसरला, म्हणजे माझ्या आयुष्यांतल्या अत्यंत महत्त्वाच्या काळांतलं रम्य वातावरण निर्माण होतं माझ्याभोवती ! पण तुम्ही तेवढंहि सुख मला लाभूं द्यायचं नाही असं

ठरवलेलं दिसतंय्—"

" त्या सुखाचे जे दुष्परिणाम तुमच्या मनावर न् शरिरावर होतात, ते लक्षांत घ्यायला नकोत का ?— "

" तुम्ही मानसशास्त्रज्ञ आहांत डॉक्टरसाहेब ! पण तुमच्या ज्ञानाची मजल पुस्तकांपलिकडे गेलेली दिसत नाही. तुम्हांला असं वाटतं का की, या रातराणीच्या फुलांच्या वासामुळं मला फिट्स् येतात ? न् तुमची अशी खात्री आहे का की , हीं झाडं तोडून टाकल्यानं त्या थांबतील ? विशिष्ट प्रसंगांच्या आठवणींच्या सुखांत रमल्यानं माणसाला फिट्स् येतात, एवढंच फक्त सांगतं तुमचं मानसशास्त्र ! त्या शास्त्राला हें कळलं पाहिजे की, त्या सुखद स्मृतींत गुंतलेल्या मनाला त्यांतून बाहेर पडल्यावर ज्या रखरखीत परिस्थितींत पुन्हा वावरावं लागतं, तिच्या दचक्यानं—गतस्मृति आणि सद्यःस्थिति यांच्यांतील तीव्रतम विरोधामुळं—त्याची मनावर व शरिरावर होणारी प्रतिक्रिया म्हणून फिट्स् येऊं शकतात—"

" पण ही रखरखीत सद्यःस्थिति तुम्ही आपण होऊनच नाही का उत्पन्न केलेली तुमच्याभोवती ? रायबहादुरांच्या न् तुमच्या वयांतलं अंतर—"

" वयांतल्या अंतरापेक्षासुद्धा मनःस्थितींतल्या अंतरानं अधिक रखरखीतपणा उत्पन्न होतो जीवनांत—"

" पण तुमच्यासारख्या बुद्धिमान् स्त्रीच्या लक्षांत ही गोष्ट आधी कशी आली नाही ? "

" काय उत्तर देऊं मी तुम्हांला या प्रश्नाचं ? रायबहादुरांचं सौजन्य इतकं विलक्षण आहे की, त्यामुळंच जीवन नीरस होऊन बसलं आहे आता माझं— "

तिच्या तोंडचें हें वाक्य पुरें होतें न होतें, तोंच रायबहादुर खोलीच्या दाराशीं आले व तोंडांतला चिरूट काढून हसत हसत म्हणाले, " काय, थांग लागतोय् का कांही पेशंटच्या मनाचा ? "

त्यांच्या त्या हास्यपूर्वक पण माधुर्यहीन आवाजांत उच्चारलेल्या

-दांनी तीं दोघेंहि दचकल्यासारखीं झालीं व त्यांनी मागे वळून पाहिलें.

तोंच रायबहादुर इंग्रजीत म्हणाले, " चालू द्या, चालू द्या तुमचं संभाषण. मी त्यांत अडथळा आणूं इच्छीत नाही— "

आणि, ते जितक्या सहजपणें तिथे आले होते, तितक्याच सहजपणें परतहि फिरले.

" यांच्या या असल्या विचित्र सौजन्यामुळंच जीवित नीरस, ओझ्यासारखं जड झालं आहे माझं! ते कोणत्याहि बाबतींत कधी माझ्या इच्छेला मोडता घालायचे नाहीत; सारीं सुखं त्यांनी माझ्या सेवेला हात जोडून उभीं केलीं आहेत; न् त्यांना कोणत्याही प्रकारची अपेक्षा माझ्यापासून नाही.—असं सुखपूर्ण पण निस्सार जीवित आहे माझं! त्या जीवितांत कुठं खटका नाही, विरोध नाही कीं संघर्ष नाही. त्यांचे मित्र न् विशेषतः मैत्रिणी सारख्या येत असतात. मला वाटलं तर मी त्यांच्या गप्पांत न् खेळांत सामील व्हावं– त्यांत त्यांना आनंद आहे. पण, मी जर सामील झालें नाहीं, तर त्याचंहि त्यांना कांही वाटायचं नाही! बरं, माझ्या खोलींत मी कुणाला घेऊन बसलें किंवा मोटारींतून कुणाला घेऊन फिरायला गेलें, तरीहि फिकीर वाटायची नाही त्यांना कधी! त्यांचा स्वभाव इतका चमत्कारिक आहे की, माझ्या टेबलावर ठेवलेला हा फोटो कुणाचा आहे, हें जरी त्यांना माहीत आहे, तरी त्या व्यक्तीचे न् माझे संबध काय होते, याची चुकूनहि चौकशी केली नाही त्यांनी कधी!"

" खरंच, कुणाचा फोटो आहे तो? " डॉक्टरांनी मध्येच विचारलें.

सुमनने सांगितलेलें नांव ऐकतांच ते दचकले. कारण मीरत कटाच्या खटल्यांतील काळ्या पाण्याची शिक्षा झालेल्या एका आरोपीचा फोटो होता तो.

" मला वाटलं होतं तुम्ही कुठं तरी पाहिला असेल तो फोटो—"

" नाही, मी मराठी वर्तमानपत्रं सहसा पहात नाही व इंग्रजीसुद्धा मेडिकल जर्नल्सशिवाय मी विशेष काळजीपूर्वक दुसरं कांही बघत नाही. पण यांचा न् तुमचा संबंध कसा आला?— "

" तो फार चमत्कारिक इतिहास आहे! पण किती वाजले असतील

आता ? ”

ती बोलतां बोलतां उठून उभी राहिली.

तिला आपल्याशीं या विषयावर बोलण्याची आता इच्छा नाही, हें डॉक्टरांच्या लक्षांत आलें; व ते हॅट डोक्यावर ठेवीत म्हणाले, “ उद्या सकाळीं येईन मी पुन्हा–”

“ तुम्ही संध्याकाळीं कां नाही येत ? आपण शेतांत फिरावयाला जाऊं आमच्या तुमची हरकत नसेल तर !—”

“ठीक आहे. मी संध्याकाळींच येईन उद्या !”

—४—

त्या दिवशीं संध्याकाळीं डॉ॰ अजित आले, त्या वेळीं रायबहादुर मार्गारेटबरोबर फिरावयाला गेले होते; व सुमन एकटीच बगीचांत हिंडत होती.

डॉक्टरांची गाडी कमानीखाली येऊन उभी राहतांच ती त्यांच्याजवळ येऊन म्हणाली, “ मग चलतां का आमचीं शेतं पहायला ? मैल दीड मैल चालण्याची तयारी आहे तुमची ? ”

“ वाटेल तितके मैल जायची तयारी आहे माझी !”

आणि तीं दोघें बगीचाचें मागचें फाटक उघडून शेतांत जावयाला निघालीं.

रायबहादुरांच्या बागबंगल्याला लागूनच मागच्या बाजूला त्यांचीं शेतें होतीं. गव्हाचीं रोपें भुईतुन वर निघालीं होतीं व हरबरा वीतभर उंच झाला होता. मावळत्या सूर्याचें ऊन त्या शेतांवर पडल्यामुळे त्यांच्या हिरव्या रंगांतील निरनिराळ्या छटा खुलून दिसत होत्या व जवसाचें फुललेलें शेत जांभळया गालिचासारखें वाटत होतें. विहिरीवर मोट चालू होती. ती चाल॰ विणाऱ्या माणसाचे बैलांना उद्देशून निघणारे शब्द, बैलांच्या गळयांतील घुंगरां॰ चा नाद आणि मोटेच्या पाण्याचा खळखळाट यांचा संमिश्र आवाज सारखा

कानांवर येत होता व आकाशांतून टोळ्याटोळ्यांनी उडत जाणाऱ्या पाखरांचे साद मनाला सोत्कंठ करीत होते.

शेतांतून चालतां चालतां सुमनने हरभऱ्याचे दोन रोपे उपटून ते डॉक्टरांच्या पुढे केले व त्यांना म्हटलें, " तुम्ही चव घेतली आहे का या रोपांची कधी ? विशेषतः तीं दवानं भिजलेलीं असतांना ? खरोखरी, एक प्रकारची विलक्षण मजा असते या खेडवळ राहणींत-"

" आणि ती मजा मनसोक्त मिळत असतांनासुद्धा तुमचं मन कष्टी आहे !—त्या फोटोविषयी काल आपण बोलत होतों—"

" होय. तुम्ही विचारलेला प्रश्न लक्ष्यांत आहे माझ्या ! " तिने सुस्कारा सोडला व ती किंचित् घोटाळून म्हणाली, " त्यांत तसं विशेष कांही नाही. ते न् मी फर्ग्युसनमध्ये शिकत असल्यापासून ओळख आहे आमची—"

" एवढ्या साध्या गोष्टीला काय तुम्ही 'इतिहास' हें मोठं नांव दिलंत ? तुम्हांला संकोच वाटतो मला सांगायचा—"

" संकोच वाटायचं वय राहिलं नाही आता माझं डॉक्टरसाहेब ! "

तिच्या गोऱ्यापान तोंडावर एकदम कशामुळे इतकी लाली आली,—उन्हामुळे कीं लाजेमुळे हें डॉक्टरांना समजेना.

ते तिच्याकडे अधीरतेने पहात म्हणाले, " तुम्हांला तो विषय त्रासदायक होत असेल, तर राहूं द्या—"

" तुम्ही तो विषय सोडला, तरी माझ्या मनांतून तो कांही जायचा नाही आता ! ते फर्ग्युसनमध्ये असतांना ओळख झाली आमची. एम्.ए.झाल्यावर आम्ही दोघं मुंबईला आलों. ते कामगार चळवळींत पडले न् मी शाळेंत नोकरी धरली. पुढं ते मीरत खटल्यांत पकडले गेले न् मी मुंबईची नोकरी सोडून मीरतला गेलें, असा तुटक तुटक इतिहास आहे हा. "

" पण शेवटचा धागा कसा न् कुठं तुटला कळलं नाही मला ! आता मला आठवतं, तुमचं न् त्यांचं लग्न होणार अशी बातमी आली होती वर्तमानपत्रांतून त्या वेळीं—"

" होय. तिथंच धागा तुटला ! मी नेहमीप्रमाणं एक दिवस त्यांना तुरुंगांत भेटायला गेलें असतां त्यांनी अचानक लग्नाचा प्रश्न काढला न् मी त्यांना ' नाही ' म्हटलं ! त्या वेळची त्यांची ती निराश मुद्रा !—शिक्षा ऐकून सुद्धा त्यांचं तोंड उतरलं नव्हतं तितकं ! ती त्यांची केविलवाणी मुद्रा न् ते डबडबलेले डोळे त्यानंतर स्वप्नांत दिसले नाहीत असा एक दिवस गेला नाही माझा !—"

" तुमचं प्रेम नव्हतं त्यांच्यावर ? "

" तसं म्हणतां येणार नाही. पण त्यांच्याशीं लग्न करण्याची कल्पना मला आवडली नाही एवढं मात्र खरं. पुष्कळदा स्त्रीला एखाद्या पुरुषाविषयी आकर्षण वाटतं;–तें आकर्षण त्याच्या बुद्धिमत्तेविषयीं किंवा कर्तबगारीविषयीं असतं;–पण त्यांत पुरेशी स्निग्धता नसते ! त्या आकर्षणाला कोणतं नांव याल तुम्ही ? प्रेम म्हणावं का त्याला ? "

" माझं मानसशास्त्राचं ज्ञान लटपटूं लागलंय् तुमच्या मनोभावनांपुढं !" डॉ० अजित हसून म्हणाले.

" मला त्यांचा सहवास अतिशयच आवडत असे आणि तरीसुद्धा त्यांच्याशीं लग्न करायची कल्पना रुचली नाही मला— "

" आणि रायबहादुरांशीं लग्न करण्याची कल्पना रुचली तुम्हांला ? "

एखाद्या तीक्ष्ण शस्त्राने भोसकावें, तसे ते उपरोधिक शब्द वाटले त्यांचे तिला.

पण ती आवंढा गिळून म्हणाली, " तिथं भावनांचा प्रश्न नव्हता. त्यांना शिक्षा झाल्यावर मी जबलपूरला आलें न् रायबहादुरांची नी माझी ओळख झाली. त्या ओळखीचं पर्यवसान अखेर तुम्ही पाहतां तसं झालं— "

" म्हणजे फिट्स् येण्यामध्ये ? तुमच्या दुखण्याचं मूळ तुम्ही आपल्या मनावर जो हा अत्याचार केलात त्यांत आहे. ज्याच्याविषयी तुम्हांला अत्यंत आकर्षण वाटलं, न् वाटत आहे, त्याच्याशीं तुम्ही लग्न करण्याचं नाकारलंत आणि ज्याच्याविषयीं तुम्हांला मुळीच आकर्षण वाटलं नाही न्

वाटत नाही त्याच्याशीं लग्न केलंत. तुमच्या जीवनांत रायबहादुरांना स्थान नाही न् त्यांच्या जीवनांत तुम्हांला स्थान नाही — "

" खरं आहे तुमचं म्हणणं ! जाऊं या आपण ! अंधार पडूं लागलाय् आता ! "

ती उठून उभी राहिली.

तीं दोघं परत आलीं, त्या वेळीं रातराणीचीं फुलें उमलून त्यांचा सुगंध बागेंत दरवळला होता.

" मग काय हीं झाडं तोडायला परवानगी आहे ना तुमची ? " डॉक्टरांनी सुमनला विचारलें.

" नाही. हीं फुलं अत्यंत प्रिय होतीं त्यांना. आमच्या सहजीवनाचीं साक्षीदार आहेत तीं ! "

—५—

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं डॉक्टर आल्याबरोबर तीं दोघं फिरायला गेलीं. तीं बागेंतून बाहेर पडलीं, त्या वेळीं सूर्य मावळत होता. मोट आता थांबली होती. आणि पक्ष्यांचें एखादद्दुसरेंच पथक तोंडाने आवाज करीत उडत जातांना दृष्टीस पडत होतें. आज कृष्णपक्षांतील तृतीया असल्यामुळे चंद्रोदयापूर्वी हवेंत उत्पन्न होणारा कुंदपणा त्या झपाट्याने लोपत चाललेल्या संधिप्रकाशांत तीव्रतेने जाणवत होता.

तीं दोघेंहि स्तब्ध होतीं. अगदी टोकाला असलेल्या शेतांत पोचल्यावर तीं एका उंच दरडीवर बसलीं.

कांही वेळाने डॉक्टरांनी इंग्रजींत विचारलें, " काल मी अगदी निर्दय-पणानं वागलों नाही तुमच्याशीं ? क्षमा करा हं मला— "

" नाही. मलाच आभार मानले पाहिजेत उलट तुमचे. तुम्ही माझी चूक अगदी स्पष्टपणानं दाखवून दिलीत मला— "

" तुम्हाला अजूनहि वाटतं तुमचं त्यांच्यावर प्रेम नव्हतं म्हणून ? "

" माझं मलाच कळत नाही मला त्यांच्याविषयी काय वाटत होतं त-त्यांच्या बुद्धीच्या प्रभावानं, स्वार्थत्यागाच्या दीप्तीनं मोहित होऊन गेलें होतें मी. त्यांच्याजवळ असलं म्हणजे आपण एका दैदीप्यमान शक्तीसमोर आहोंत असं वाटत असे सारखं—"

" काल जवळ जवळ हेच शब्द तुम्ही माझ्याविषयीहि बोलतांना वापरले होतेत—"

" होय. तुम्हाला मी पहिल्या दिवशीं पाहिलं, तेव्हा कितीतरी दिवसांनी त्यांच्यासारख्या एका प्रभावशाली व्यक्तीसमोर उभं असल्याचा भास झाला मला. आजपर्यंत माझी ही मनोव्यथा मी सांगितली नव्हती कुणाला. पण तुमच्याविषयी जें बौद्धिक आकर्षण मला वाटलं, त्याच्या जोरावर तुम्ही वदवलंत माझ्या मनांतलं दुःख माझ्या तोंडून—"

" त्या दुःखाचं शल्य तुमच्या मनांतून काढून टाकणं अशक्य नाही सुमनबाई !— "

तिने एक उसासा सोडला.

डॉक्टरांनी हळूच तिचा हात आपल्या हातांत घेतला. तिने प्रतिकार केला नाही किंवा उत्सुकताहि दर्शविली नाही.

ते नंतर हळूच म्हणाले, " सुमन, मी जर तुला तोच प्रश्न विचारला, तर मलाहि तूं ' नाही ' असंच उत्तर देशील का ? "

" पण आता तो प्रश्नच मुळी उद्भवत नाही. आपल्या समाजांतल्या स्त्रीला आयुष्यांत त्या प्रश्नाचं उत्तर फक्त एकदाच देतां येतं न् तें मी राय-बहादुरांना दिलं आहे— "

" चुकीची आहे ही तुझी कल्पना. तुमचं लग्न नोंदणीनं झालं आहे. तें कांही अविच्छेद्य नाही— "

" कायद्याच्या दृष्टीनं नसेल, पण समाजाच्या दृष्टीनं, माझ्या कमकुवत मनाच्या दृष्टीनं आहे— "

डॉक्टरांनी तिचा हात आपल्या हातांत घट्ट दाबला; आपलीं ताठर बोटें

तिच्या नाजुक दुलदुलीत तळव्यांत त्यांनी रोवलीं;— तिच्या अंगावर थरारून शहारे आले !

" मग काय असंच चालायचं आता ?" डॉक्टरांनी अत्यंत व्याकुळतेने विचारलें.

" होय. त्याला कांही इलाज नाही ! " ती त्यांच्या हातांतून आपला हात सोडवून घेऊन उठतां उठतां म्हणाली, " पण डॉक्टर, तुम्ही माझे स्नेही आहांत न् हा आपला स्नेह जन्मभर राहुला पाहिजे— "

" तें शक्य नाही सुमन ! माझा स्वभाव अर्ध्यावर थांबण्याचा नाही. मला जन्मांत कोणा स्त्रीविषयीं जें आकर्षण वाटलं नाही, तें तुझ्याविषयीं वाटलं. तें आकर्षण नुसत्या स्नेहानं तृप्त होणार नाही— "

त्यांनी चालतां चालतां पुन्हा एकवार तिचा हात धरला.

त्याबरोबर त्यांची टॉर्चवरील पकड सैल होऊन शेतांतील पाऊलवाटेवर अंधार पडला.

तेव्हा त्यांच्या हातांतून आपला हात सोडवून घेऊन सुमन म्हणाली, " आपण शेतांतून जातों आहोंत, हें विसरूं नका— "

त्यांनी मुकाट्याने तिचा हात सोडला; व टॉर्चचा प्रकाश पाडीत ते न बोलतां चालूं लागले.

ते बगीचांत परत आले, त्या वेळीं रातराणीच्या फुलांचा सुवास दरवळला होता.

रायबहादुर व्हरांड्यांत बसले होते. त्यांना बघितल्याबरोबर ते हसत हसत पुढे येऊन म्हणाले, " आज उशीर झाला फिरून परत यायला तुम्हांला ! मग काय मिळाली परवानगी डॉक्टरसाहेब, तुम्हांला झाडं तोडायची ?— "

" कांही फायदा होणार नाही तीं झाडं तोडून ! " डॉक्टर अगदी रुक्षपणाने म्हणाले.

आणि रायबहादुरांशीं चार औपचारिक शब्द बोलून त्यांनी तडक आपली मोटार गाठली.

घरीं पोचल्याबरोबर डॉक्टरांनी कपडे काढून नोकराच्या हातीं दिले आणि व्हरांड्यांत ठेवलेल्या खुर्चीवर अंग टाकून चिरूट शिलगावला.

क्षितिजावर रेंगाळत असलेल्या छिन्नविच्छिन्न ढगांतून वाट काढीत चंद्र हळुहळू वर येत होता.

त्याच्या त्या पीतधवल प्रकाशांत सुमनची कमनीय पण करुणगंभीर मूर्ति डॉक्टरांच्या डोळ्यांपुढे उभी राहिली.

आणि रातराणीच्या नुकत्याच उमललेल्या फुलांचा दरवळ आपल्या भोंवतीं पसरतो आहे, असें त्यांना वाटलें.

—फेब्रुवारी १९३७

## २ : : : सशाचे डोळे

" भली खोड मोडली ! भली खोड मोडली !! "

आकाशांतल्या सगळ्या तारका टाळ्या पिटीत ओरडत होत्या.

बिचारा ससा धापा टाकीत पळत होता.

नंदनवनांतलीं सगळीं फुलें आणि आकाशगंगेंतलीं सगळीं कमळें त्याची ती फजिती पाहून खदखदा हसत होतीं.

आकाशांतल्या तारकांना, नंदनवनांतल्या फुलांना आणि आकाशगंगेंतल्या कमळांना सशाची ती फजिती पाहून जो इतका आनंद झाला होता, तो कांही उगाच नव्हे.

त्या आनंदाला तसेंच कारण होतें.

तारकांचा राजा चंद्र हा एकदा आपल्या हरिणाच्या रथांत बसून नंदनवनांत फिरावयाला गेला होता. तेथे त्याला एका गोकर्णीच्या वेलाखाली एक चिमुकला, पांढराशुभ्र प्राणी दिसला. हिरवीं हिरवीं पानें आणि निळीं निळीं फुलें यांच्या गर्दीत तो गोजिरवाणा प्राणी पिंजलेल्या कापसाच्या राशीसारखा दिसत होता; व त्याचे उभारलेले

कान पांढऱ्या चाफ्याच्या पाकळ्यांसारखे वाटत होते. आपल्या मागल्या पायांवर उभा राहून तो गोकर्णीचीं कोवळीं कोवळीं पानें लुबुलुबू खात होता.

तो गोजिरवाणा प्राणी म्हणजे ससा होता.

चंद्राला तो ससा पाहून मोठी गंमत वाटली. तो आपला रथ थांबवून हळूच खाली उतरला व पानें खाण्यांत गर्क असलेल्या त्या सशाला त्याने अलगत धरलें. ससा म्हणजे साऱ्या मुलखाचा भित्रा. पण चंद्राच्या हातांचा स्पर्श सशाला इतका कांही आवडला की, त्यांतून सुटून जाण्याची धडपड न करितां, तो उलट त्याचे हात चाटावयाला लागला. चंद्राने त्याला कुरवाळून आपल्या छाती-पाशी धरलें; व चंद्राला त्याचा इतका कांही लळा लागला की, आकाशांतून सहल करतांना तो नेहमी सशाला आपल्याबरोबर नेत असे.

चंद्राने सशाला जवळ घेतला, म्हणजे त्याच्या प्रकाशांत सशाचें पांढरेंशुभ्र शरीर हिऱ्यासारखें चमकत असे; व त्याचे निळे-काळे डोळे इतके लखलखत की, आभाळांतल्या साऱ्या तारकांचें तेज त्याच्यापुढे फिकें पडत असे. त्यामुळे सारें जग त्याच्याकडे कौतुकाने बघूं लागलें. त्याचा सशाला गर्व झाला. त्याला असें वाटूं लागलें कीं, नंदनवनांतलीं फुलें, आकाशगंगेंतलीं कमळें किंवा चंद्राभोवतालचीं नक्षत्रें यांचें सौंदर्य आपल्यापुढे कांहीच नाही. फार काय, त्याचा हळूहळू असाहि समज झाला की, चंद्र आकाशांत फिरावयाला लागतांच साऱ्या पृथ्वीवर जो प्रकाश पडतो, तो म्हणजे खरोखरी आपल्या स्वतःच्या सौंदर्याचेंच तेज होय.

सशाच्या पोटांत हा गर्व कांही मावला नाही.

चंद्राच्या रथाला जो हरिण जोडला जात असे, त्याची

आणि सशाची फार चुरस होती. ससा दृष्टीस पडण्यापूर्वी चंद्राला त्या हरिणाचा अतिशय लळा होता व पुष्कळदा त्याला प्रेमाने आपल्या छातीशीं धरून चंद्र आकाशांत फिरावयाला निघत असे; पण चंद्राने ससा बाळगल्यापासून हरिणाला एकदाहि आपल्या छातीवर डोकें टेकविण्याची संधि मिळाली नाही. सदा न् कदा ससा आपला धन्याच्या छातीवर रेललेला असावयाचा. त्यामुळे हरिणाला सशाचा फार राग आला. त्याला वाटे, आपण धन्याचा रथ ओढून त्याची एवढी चाकरी बजावतों; पण आपल्या अंगावरून त्याचा कधी मायेने हात फिरेल तर शपथ ! आणि कांही काम न करणारा हा ऐतखाऊ ससा मात्र अष्टौप्रहर धन्याच्या अंगावर लोळत असतो ! त्याचा पांढरा रंग सुंदर असला, तर आपला तपकिरी रंग कांही कमी सुंदर नाही; व आपले काळेभोर टपोरे डोळे तर त्याच्या त्या लुकलुकणाऱ्या लहानशा डोळ्यांपेक्षा कितीतरी सुंदर आहेत ! छे, छे ! तें कांही नाही. कसेंतरी करून या गर्विष्ठ सशाला आपल्या धन्याच्या मर्जीतून हुसकून लावलाच पाहिजे.

सशाला गोकर्णीचीं पानें फार आवडत असत व तिच्या वेलाला आपल्याशिवाय दुसऱ्या कोणीहि तोंड लावलेलें त्याला खपत नसे. एक दिवस असें झालें की, धन्याला खूप हिंडवून परत आल्यावर भुकेलेला हरिण त्या वेलाजवळ जाऊन त्याचीं पानें खाऊं लागला. त्याबरोबर आपले दोन्ही कान उभारून आणि मागल्या पायांवर उभा राहून ससा तावातावाने त्याला म्हणाला, "या गोकर्णीचीं पानें तूं कां खातोस ? तुला माहीत नाही, ही गोकर्णी माझी आहे हें ?"

भुकेल्या हरिणाला त्याच्या या बोलण्याची चीड आली; व तो संतापाने उद्गारला, "तुला कोणी दिली रे ही गोकर्णी ऐतखाऊ ? मी सारा दिवस धन्याचा रथ ओढून दमलों अन् तूं मला

सुखानं चार पानंसुद्धा खाऊं देत नाहीस —"

हरिणाने आपल्याला 'ऐतखाऊ' म्हटलें, याचा सशाला विलक्षण राग आला; व तो आपली छाती फुगवून म्हणाला, "ऐतखाऊ कुणाला म्हणतोस रे! तूं फार तर धन्याचा रथ ओढीत असशील; पण मी धन्याच्या छातीवर रेलून साऱ्या जगाला प्रकाश देत असतों!"

त्याची ती मूर्खपणाची बढाई ऐकून रागावलेल्या हरिणाला एकदम हसूं कोसळलें; व तो त्याला म्हणाला, "काय, जगाला तूं प्रकाश देतोस?"

"होय, होय! मी प्रकाश देतों!" ससा चिडून उद्गारला. "लोक ज्याला चांदणें म्हणतात ना, तें सारें माझ्या पांढऱ्या शुभ्र शरिराचें तेज आहे, समजलास?"

"वा वा! काय तेज! काय तेज! तुझा हा अजब शोध मला महाराजांना सांगितलाच पाहिजे आधी!" हरिण म्हणाला.

ते दोघे लगेच चंद्राकडे गेले. ससा जवळ येतांच चंद्राने त्याला उचलून छातीपाशीं धरलें व सशाने त्याचे हात चाटावयाला सुरवात केली.

त्यावरोबर हरिण चंद्राला म्हणाला, "महाराज, आपला हा लाडका ससा मोठा लुच्चा आणि बढाईखोर आहे!—"

"कसा काय रे बाबा?" चंद्राने विचारलें.

"हा आताच मला सांगत होता की, 'आपण आकाशांतून फिरत असतां जें चांदणें पृथ्वीवर पडतें, तें सारें याच्या शरिराचें तेज आहे—'"

हरिणाच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच चंद्राला एकदम राग आला व तो सशाला म्हणाला, "खरं काय रे हा सांगतो तें?"

धन्याचा तो राग बघून ससा घाबरून गेला व त्याला काय उत्तर द्यावें, तें सुचेना.

तेव्हा चंद्राने त्याला खाली लोटून दिलें व म्हटलें, "मला वाटलं नव्हतं तूं इतका मूर्ख असशील म्हणून ! पृथ्वीवर जा न् पाड आपल्या तेजाचा प्रकाश हवा तितका ! "

ससा अगदी रडकुंडीला आला आणि गयावया करूं लागला.

अखेर चंद्राला त्याची दया आली व त्याने त्याला म्हटलें, "मी आता कांही झालें तरी तुला कांही पूर्वीसारखा सदोदित माझ्या अंगावर वागवणार नाहीं. फार तर पौर्णिमेच्या रात्रीं कांही वेळ तुला छातीशीं धरीन ! तूं चालता हो आता इथून— "

सर्वांसमक्ष झालेल्या आपल्या या अपमानाचें आणि अधः-पाताचें सशाला अतिशय दुःख झालें व आपली चुगली करणाऱ्या हरिणाचा तर त्याला भयंकर संताप आला.

त्या दुःखसंतापाने त्याचे ते निळेकाळे डोळे एकदम लालभडक होऊन गेले; व त्या वेळीं एकदा जे ते लाल झाले, ते कायमचेच !

तेव्हापासून फक्त पौर्णिमेच्या रात्रीं मात्र चंद्रोदयाच्या वेळीं ससा चंद्राच्या छातीवर रेललेला दृष्टीस पडतो.

—जानेवारी १९३७

## ३ : : : अखेरची इच्छा

आज तीन दिवस झाले, पार्वतीचा जीव मृत्यूच्या दाराशीं घुटमळत होता. अंधुक प्रकाशांत क्षितिजावर अस्पष्ट आकृति दिसावी, तसें तिचें अंथरुणावर पडलेलें अस्थिशेष शरीर दिसत होतें. तिचा मूळचा उज्ज्वल, पीतगौर वर्ण काळवण्डून गेला होता. विस्कळित केशभाराने वेष्टिलेलें तिचें फिकट तोंड ढगांच्या पुंजक्यांनी घेरलेल्या पहाटेच्या चंद्रासारखे दिसत होतें. आणि, निरनिराळ्या रंगांच्या छटा दर्शविणाऱ्या मोत्याप्रमाणे एकाच वेळीं अनेक भाव व्यक्त करणारे तिचे ते विशाल डोळे !—हाय, हाय !—त्यांच्यांतील तें भावगर्भ तेज लुप्त होऊन, मृत्यूची गर्द छाया आता त्यांच्या भोवती पडली होती. तिची आई केव्हा केव्हा त्या निराशेंतहि आशा प्रकट करीत असे. त्या वेळीं पार्वतीच्या त्या निस्तेज डोळ्यांत, खोल विहिरींत पडलेल्या कवडशाप्रमाणे, उपरोधिक हास्याची भयाण चमक खेळे. आज दुपारपासून तिचा जीव सारखा घाबरा होत होता.

शेजाऱ्यांना वाटे की, मुलासाठी बिचारीचा जीव घुटमळत आहे. आणि तसें वाटावें अशीच खरोखरी स्थिति होती. पंचविशीच्या आंतच पार्वतीला सहा मुलें झालीं. पण त्यांपैकी पहिला आणि शेवटचा असे दोन

मुलगेच काय ते देवदयेने तिला लाभले. मृत्युमुखीं पडलेल्या आपल्या तान्ह्या मुलींची आठवण झाली, म्हणजे तिचें हृदय अतिशय तडफडे. परन्तु त्या दुःखांतहि ती समाधान मानीत असे. ती स्वत: स्त्री होती; पण स्त्रीजन्म ही तिला एक आपत्तीच वाटे. शिवाय उमाकांतांनी तरी पुत्रप्राप्तीसाठीच मुद्दाम हें दुसरें लग्न केलें होतें ना ?—दोघांही मुलांवर पार्वतीचें फार प्रेम होतें. त्यांना जन्म देतांना तिचा स्वतःचाही पुनर्जन्म झालेला होता. विशेषतः, अवघड शस्त्रक्रियेनन्तर मोठ्या कष्टाने सुखरूप जन्मास आलेला धाकटा मुलगा,—त्याच्यावर तर तिचें अतीव प्रेम होतें. त्या दीड वर्षांच्या अर्भकाने बोबड्या शब्दांनी मारलेली हाक कानावर पडली, म्हणजे तिचे डोळे आंसवांनी भरून येत; व आपल्या जन्माचें सार्थक झालें, असें तिला वाटे.

पार्वतीच्या मागे त्या मुलांचें कसें होणार ?

आज पांच वर्षें झालीं, पार्वतीची आई आपल्या मुलांसह तिच्या-जवळच येऊन राहिली होती. त्या अनाथ विधवेला जसा पार्वतीचा आधार, तसाच विरागी पार्वतीला तिचा आधार वाटे. ती स्वतः दुःखी होऊन लेकीच्या आसऱ्याला आली खरी; पण पार्वतीचें दुःखी जीवित तिने आनंदमय केलें. आई हेंच तिचें प्रेमसर्वस्व,—तिच्या वंचित जिवाचा विरंगुळा होता. आईप्रमाणे पार्वतीच्याच वयाची तिची सावत्र मुलगीही घरांत होती. तिच्या भरलेल्या संसारांत सगुणा हें एक पावलोपावलीं जाचणारें शल्य होतें. त्या बालविधवेच्या पोळलेल्या जीविताच्या संतापाची आंच लागून, पार्वतीचें आधीच शुष्क असलेलें वैवाहिक जीवन करपून गेलें होतें. सगुणा मागे येऊन चार महिने होतात न होतात, तोंच उमाकांतांनी आपलें दुसरें लग्न उरकून घेऊन, पार्वतीला घरांत आणली. मंगलवाद्यांच्या गजरांत माई ज्या दिवशीं घरांत आली, तो दिवस !— तो दिवस त्या अभागिनीने जमिनीवर लोळून रडत घाल-विला होता. तिला वैधव्य आलें, यांत बिचाऱ्या पार्वतीचा काय दोष ?

पण सगुणेला भाईविषयी अतिशय मत्सर, अतिशय तिटकारा वाटे. पार्वतीच्या मुलांवर मात्र तिचा जीव होता. पण किती झालें, तरी ती सावत्र बहीण !

परन्तु पार्वतीचा जीव खरोखरीच मुलांसाठी घुटमळत होता का ?

ती डोळे मिटून निपचित पडलेली होती. मृत्यूची ओढ लागून मिटलेल्या त्या डोळ्यांपुढून तिच्या जीवितांतील दृश्यें एकामागून एक वेगाने निघून जात होतीं. उशाशीं कपाळ चेपीत बसलेली आपली करुण-मूर्ति आई, पायथ्याशी पाय चुरीत बसलेली नवोढा बहीण गौरी आणि समोर मुलांना मांडीवर घेऊन बसलेले उमाकांत,–यांपैकी कोणाकडेच तिचें लक्ष नव्हतें. जणू कांही, अंतःकरणांत साठवून ठेवलेलीं तीं दृश्यें, आयुष्या-च्या शेवटच्या क्षणीं, ती अतृप्त मनाने एकवार अखेरचीं पाहून घेत होती. तिच्या पापण्या मधून मधून हालत; ओठांचीं करपलेलीं दळें थरथरत; व अंगावर शहारे आल्यासारखाहि क्वचित् भास होई. भोवतालच्या जगाशीं असलेला तिचा ऋणानुबंध आता बहुतेक तुटत आलेला होता. पण, फळ झाडापासून तुटत असतांना, तें जमिनीवर गळून पडण्यापूर्वी, जीवनरसाने क्षणमात्र मागे ओढून धरावें, तशी तिच्या आत्म्याची अवस्था झाली होती.

तिचा जीव कोणासाठी ओढ घेत होता ? तिला कोणतीं दृश्यें दिसत होतीं ?

तिला आपल्या बाळपणाची आठवण झाली. आजोळीं असतांना ती एकदा आईबरोबर देवळांत गेली होती. त्या वेळीं देवीपुढे ठेविलेल्या निरांजनाला तिचा पाय लागून तें उपडें पडून विझलें. तेव्हा तिथे बसलेली देवस्क्या करणारी म्हातारी गुरविण तिच्या आईला म्हणाली, "बये, तुझी मूल मोठ्या कपाळाची खरी; पण, तिच्या कपाळीं सुख नाही ग !" तिचे नाना नेहमी म्हणत, "पोरी, तूं मुलगा झाली असतीस तर तुला शास्त्रविद्या पढवून मी पंडित केलें असतें. पण तूं मुलीच्या जन्माला आलीस; आणि त्यांत तुझ्या कपाळीं वैधव्ययोग !" हा योग टळावा म्हणून मुद्दाम त्यांनी

तिला उमाकान्तांसारख्या वयस्क बिजवराला दिलें.

लग्नानन्तर वर्षाच्या आंतच ओढवलेला पतीच्या भेटीचा पहिला प्रसंग पार्वतीच्या डोळ्यांपुढे उभा राहिला. स्त्रीच्या जीवनांतील सर्वांत रहस्यमय प्रसंग तो!– त्या प्रसंगीं स्त्रीचें हृदयपुष्प कायमचें उमलतें तरी किंवा खुरटतें तरी!– पण, त्या प्रसंगाचें स्मरण होतांच पार्वतीच्या अंगावर शहारे येत. उमाकांतांचें तिच्यावर अतिशय प्रेम होतें; तिचा प्रत्येक शब्द ते फुलासारखा झेलीत; व तिचे प्राण वांचविण्यासाठी त्यांनी पाण्यासारखा पैसा खर्च केला होता. पण त्या रात्रीं त्यांच्याविषयी जो उबग तिच्या कोमल मनांत एकदा उत्पन्न झाला, तो पुढे कधींहि निःशेष नाहीसा झाला नाहीं. अत्तरासाठी कुस्करल्या जाणाऱ्या फुलासारखा आपला जन्म आहे, असें तिला वाटलें; व वर चढावयाला आधार न मिळालेली वेल जशी मुरडून भुईवरच पसरते, तसा त्या मुग्धेच्या वंचित हृदयांतील प्रेमाचा ओघ उलट खाऊन उगमाकडे वळला.

त्याच रात्रीं तिने निश्चय केला!– आपलें जें झालें तें झालें; पण, गौरीला मात्र आता अनुरूप स्थळींच द्यावयाची. पण काय?— त्यानन्तर गौरी जी तिच्या घरीं आली, ती तिला न कळतां लग्न होऊनच आली. आणि आली ती तरी कशी?—केळीच्या कोंबासारखी पोर!— पण, तिचा सारा उल्हास, तिचें सारें शैशव आता अगदी कोळपून गेलेलें होतें. त्या गोष्टीची आठवण झाली, म्हणजे गौरीला कुष्टरोग्याच्या गळ्यांत बांधणाऱ्या आपल्या मामाचा पार्वतीला अगदी संताप येत असे. उमाकांत बिजवर खरे. पण, गौरीच्या मानाने आपण सुखी, खरोखरीच किती तरी सुखी, असें त्या दिवशीं तिला वाटलें.

त्याच्याहि पूर्वीचा एक प्रसंग तिच्या डोळ्यांपुढे उभा राहिला. पहिल्या प्लेगचे दिवस. तिचे वडील अंथरुणावर तडफडत पडले होते. हातावर कपाळ टेकून त्यांच्या अंथरुणाजवळ रडत बसलेली आई आणि आईकडून नानांकडे व नानांकडून आईकडे टकमकां पाहणारीं भावंडें! "साऱ्या भावंडांत आपण वडील; आपण जर मुलाच्या जन्माला आलों असतों तर!–

आईला आज आपला केवढा आधार वाटला असता!"— हा विचार मनांत विजेसारखा चमकून, तिच्या हृदयाला त्या वेळीं केवढा पीळ पडला!

आणखी एक दृश्य तिला आठवलें.

त्यानन्तर ती आजोळीं गेली होती. काकांनी घरांतून काढून दिलेली तिची आई आता मामाच्या आश्रयाला आलेली होती. नानांच्या मृत्यूनंतर मायलेकींची ती पहिलीच भेट!— "किती दिवस, ग अक्का, वहिनींचीं हीं कुजकीं बोलणीं मी आता सोसूं ?"—"आई, माझ्याच घरीं चल तूं आता; मी तुला जन्मभर अंतर देणार नाही !" —हा तुळशीजवळ दिवा लावतांना तिथे झालेला संवाद पार्वतीला आठवला. आणि आता, — आज आपण आईला अखेर एकटी, निराधार सोडून जाणार ? —

— पार्वतीच्या शरिरांतील सर्व चैतन्य एकवटून, तिने डोळे उघडले. एकवार आईकडे व एकवार बहिणीकडे बघून, तिने उसासा टाकला. त्याबरोबर आईने डाळिंबाच्या रसाचे थेंब हळूहळू तिच्या जिभेवर सोडले. तिला थोडी हुशारी वाटली; व तिचे ते विशाल डोळे आशेने लुकलुकूं लागले: तिने उत्कंठेने आपल्या पतीकडे पाहिलें. उमाकांतांनी तिचा हात आपल्या हातांत घेतला; व अत्यंत करुण दृष्टीने तिच्याकडे पाहिलें. त्यांचे ओंठ हालूं लागले. पण, ते कांही बोलणार, तोंच त्यांच्या दृष्टींत आपली दृष्टि मिसळून, पार्वती एकदम म्हणाली, "—मुलें तुमचींच आहेत, त्यांना कांही कमी नाही. ताई त्यांचें यथास्थित करील. पण माझी आई ?— तिचे पाय एकदा जमिनीला लागले असते, म्हणजे मी सुखाने मेलें असतें! —तिच्या पदरांत तीन मुलें; — आणि ही गौरी ? — नवरा असून नसून सारखाच !— आता माझ्या मागे यांना—"

हेच तिचे शेवटचे शब्द.

—डिसेंबर १९३०

४ : : : : अमीना

मी कोर्टाच्या खोलींतून बाहेर पडलों, तोंच दाराशीं उभ्या असलेल्या हुसेनने मला अदबीने सलाम करून म्हटलें—

" हुजूर, बाईंनी आपल्याला आत्ताच्या आत्ता बोलावलंय् बंगल्यावर—"

" आत्ताच्या आत्ता ?— "

" हां जी ! —"

त्याने पुन्हा सलाम करून म्हटलें.

" बाईंना सांग, ते घरीं जाऊन चहा वगैरे घेऊन तासाभरानं येताहेत बंगल्यावर— "

" नाही साहेब ! मी जर आपल्याला घेऊन गेलों नाही असाच इथून, तर नोकरीला मुकण्याचा प्रसंग येईल आज माझ्यावर— "

त्याने आपल्या डोक्यावरील विटक्या हिरवट रंगाचा साफा मागे सारून घामाने ओल्या झालेल्या कपाळावर हात फिरवीत काकुळतीने म्हटलें.

" वेड लागलेलं दिसतंय् तुझ्या मालकिणीला आज, हुसेन ! मला कांही घरदार आहे कीं नाही ?— "

मी आसिकपणाने उद्गारलों.

पण, त्याच क्षणाला मला मनांतून मात्र वाटूं लागलें होतें की, याला जर मुद्दाम इतक्या लांब अमीनेने मला आणण्यासाठी पाठविला आहे, तर कोर्टांतून परस्पर तिच्याकडे जाऊन बघावें तरी कशासाठी तिने बोलावलें आहे एवढें तें !

परंतु, त्या कल्पनेमागोमागच माझ्या मनांत विचार आला—ऊर्मिला चहासाठी वाट पहात असेल घरीं माझी ! चहा घेतल्यावर बॅडमिंटन न खेळतां जरी तसाच मी घरांतून बाहेर पडलों, तरी तिला वाटावयाचें नाही त्याचें कांही फारसें. पण, मी रोजच्या प्रमाणे चहासुद्धा घ्यावयाला जर वेळेवर घरीं गेलों नाहीं, तर मात्र !—

माझ्या वर्तनाविषयींची आपली नाराजी फक्त भ्रूभंगाने व्यक्त करणाऱ्या अबोल ऊर्मिलेचे ते बोलके डोळे माझ्याकडे साशंकतेने बघत आहेत, माझ्या अंतरंगाचा ठाव घेत आहेत, असें वाटलें मला !

अमीनाला आमच्या शहरीं येऊन पंधरा दिवस झाले होते आता. या पंधरवड्यांत तिच्या गाण्याच्या तीन सार्वजनिक मैफली झाल्या; व खासगी बैठकी तर बड्या बड्या लोकांकडे रोजच होत होत्या. तिचा आणि माझा कांही पूर्वपरिचय असेल, याची कल्पनाहि ऊर्मिलेला नव्हती. मी स्वतः बऱ्यापैकी गात असे; व गावांत कोणीहि गाणारें माणूस आलें, म्हणजे त्याची बैठक आमच्या घरीं झाल्याशिवाय रहात नसे, ही गोष्ट खरी. पण अमीना ! —तिची आणि माझी इतकी सलगी असावी, हें अगदी कसेसेंच वाटलें ऊर्मिलेला !

तरी मी तिचें येण्याविषयींचें पत्र आल्याबरोबर ऊर्मिलेला सांगितलें की, माझी एक गुरुभगिनी येथे जलसे करण्यासाठी यावयाची असून, तिचे कार्यक्रम यशस्वी करून दाखविण्याची सर्व जबाबदारी तिने माझ्यावर टाकली असल्या-मुळे, मला कोर्टाबाहेरचा बहुतेक वेळ तिच्या कामाला द्यावा लागेल. मुंबईला कॉलेजांत असतांना अबदुल करीमखांसाहेबांच्या हाताखालीं आम्हीं दोघांनी चार वर्षें कसें एकत्र गायनाचें शिक्षण घेतलें, याची गंमतीदार हकीकतही मी तिच्या कानांवर घालून ठेवली होती.

इतकेंच नव्हे, तर अमीना स्टेशनवर उतरल्याबरोबर, मी तिला तिच्या मुक्कामाच्या जागीं न पोचवितां, तडीच माझ्या मोटारींतून घरीं घेऊन आलों. माझा उद्देश एवढाच होता की, आल्याक्षणींच तिची आणि ऊर्मिलेची ओळख एकदा होऊन गेली, म्हणजे पुढे जरी तिच्या सहवासांत आपण अधिक आगळा वेळ घालविला, तरी ऊर्मिलेला मग त्याचें फारसें कांही वाटणार नाही—

पण, तिला बघितल्याबरोबर ऊर्मिलेच्या कपाळाला ज्या सूक्ष्म आंठ्या क्षणार्धच पडल्या, त्या पाहून माझा सर्व उत्साह मावळून गेला. अमीनेच्या मानाने ऊर्मिला खरोखरीच सुंदर होती. काळी, रोड, किंचित् कलतें नाक असलेली अमीना !—मला वाटलें नव्हतें तिच्याविषयी ऊर्मिलेच्या मनांत असूया कधी उत्पन्न होईल असें !—

तिला तिच्या मुक्कामीं पोचवून आल्यावर मी ऊर्मिलेला मुद्दामच विचारलें, " कशी काय वाटली ग अमीना तुला ? चारचौघींसारखी आहे नाही ?—"

तिने अगदी संथपणाने मजकडे बघून म्हटलें, " कोणत्या अर्थानं विचारतां तुम्ही मला ?— "

" नाही, म्हटलं कशी वाटली तुला ती ? "—

" मला ती चंचल न् लाघवी वाटली !—"

खरें होतें तिचें तें म्हणणें अगदी. अमीनेचे ते टपोरे चंचळ डोळे, बोलतां बोलतां गाण्याचे स्वतःशींच आलाप घेण्याची मोहक लकब आणि वागण्यांतला नाचरा लडिवाळपणा ! स्टेशनवर उतरल्यापासून तिने माझें चित्त आकर्षून घेतलें होतें आपल्याकडे !—

हा सारा प्रकार झरकन् माझ्या मनांत येऊन गेला आणि मी हुसेनला म्हटलें—

" बाईना सांग, मी तुझ्या पाठोपाठच येतों आहे घरीं जाऊन—"

" नाही जनाब ! बाई सारखी वाट पहाताहेत आपली.—मला निक्षून सांगितलंय् त्यांनी आपल्याला ताबडतोब घेऊन यायला—"

" बरं, चल बैस माझ्या शेजारीं !—"

मी स्वतःवर अतिशयच रागावलों होतों. आपल्या हातून चूक घडत आहे, हें मला दिसत होतें. पण ती करण्याचा मोह मात्र मला आवरला नाही आणि त्यामुळे मी स्वतःवर रागावलों होतों.

आमची गाडी बंगल्याच्या आवारांत शिरली,त्या वेळीं अमीना व्हरांड्यांतील खुर्चीवर बसलेली होती.

मला पाहतांच ती धावत खाली आली आणि मोटार थांबल्याबरोबर तिच्या चाकावर असलेला माझा हात एकदम घट्ट धरून म्हणाली—

" किती उशीर केलात तुम्हीं यायला, भाई ?"

" उशीर ? मी कोर्टांतून तसाच परस्पर आलों तुझ्याकडे ! बरं, पण एवढ्या घाईनं का बोलावलंस तूं मला ? "

मी गाडींतून उतरतां उतरतां विचारलें.

तिने तोंडावर आलेले केंस आपल्या नाजूक, लांबट बोटांनी मागे सारीत म्हटलें—

" आज दुपारपासून बेचैन आहें मी अगदी—"

" का ? फार पैसा मिळाल्यामुळं तूं बेचैन झालेली दिसतेस !—"

मी व्हरांड्यांतील खुर्चीवर बसतां बसतां हंसून म्हटलें.

पण ती अगदी गंभीरपणाने उद्गारली—

" होय, तसंच ! आज दुपारीं झोपेंत मला स्वप्न पडलं. तें आठवत नाही आता नीटसं.— पण मी त्यांतून दचकून उठलें न् माझ्या मनांत एकदम आलं, आपल्या हातून मोठी चूक झाली ! "

" चूक ?—"

" होय चूक, मला इथं येऊन पंधरा दिवस झाले आता. पण मी कांही मुजऱ्याला गेलें नाही अद्याप उस्मानशहाच्या !—"

" एवढंच ना ? मग त्यांत कसली आली आहे चूक ?—"

" हें काय हो ? तुम्हाला कांही कळत नाही, भाई !" तिने रागाच्या कालिश आविर्भावाने मजकडे पाहून म्हटलें. " आमची अशी पद्धत असते की, ज्या गावांत जायचं तिथं जर दर्गा असेल, तर पहिली बैठक त्या दर्ग्यापुढं करायची न् मग जलसे करायचे—"

" पण उस्मानशहाच्या दर्ग्यापुढं गाणं न करतांच तर तुला इतका चांगला पैसा मिळाला !—"

" त्यामुळंच तें चमत्कारिक स्वप्न पडलं मला न् जागी झाल्याबरोबर ती गोष्ट माझ्या मनांत आली. तें कांही नाही. आत्ताच्या आत्ता आपण उस्मान-शहाच्या दर्शनाला जायचं आणि मुजरा करून परत यायचं !—"

" अग, पण इथून चांगला वीस मैलांवर आहे ना तो दर्गा ?—"

" मग असेना का ! तुमच्या गाडींतून सहज जाऊन येऊं आपण."

" पण अमीना उद्या गेलं तर नाही का चालणार ?—"

" छे: हो ! तुम्हाला कल्पना नाही भाई, माझ्या मनाची कशी सारखी तळमळ होऊन राहिली आहे याची ! आत्ताच्या आत्ता निघायचं गडे !—"

तिनें चटकन् मी कपाळावर ठेवलेला हात ओढून आपल्या हातांत घेत म्हटलें.

मी तिच्या हातांतून आपला हात सोडवून घेतला आणि तिला म्हटलें—

" आता आपण दोघं आधी घरीं जाऊं आमच्या ! तूंच ऊर्मिलेला सांग आपला हा बेत, न् तिनं परवानगी दिली तर जायचं आपण—"

" आज ही अगदी नवीनच अट घालतां आहांत तुम्ही भाई !—"

तिने आपल्या तांबूलरंजित रेखीव ओठावर बोट ठेऊन माझ्याकडे किंचित् कुतूहलाने पहात म्हटलें.

पण मी माझ्या आवाजांत थोडा कठोरपणा आणून म्हणालों—

" ही माझी अट मान्य असेल तुला तरच मी येईन तुझ्याबरोबर—!"

तिने माझ्याकडे क्षणमात्र रोखून पाहिलें आणि ती म्हणाली—

" ठीक. चला तुमच्या घरीं—"

आम्ही घरीं जाऊन पोचलों, त्या वेळीं व्हरांड्यांतील टेबलावर चहाची सर्व तयारी करून ठेवलेली होती. मोटारीचा आवाज होतांच ऊर्मिला हसत हसत पुढे आली—

—पण माझ्या शेजारीं बसलेल्या अमीनेला पाहतांच तिच्या मुद्रेंत एकदम बदल झाला.

माझ्याहि लक्षांत ती गोष्ट आली. पण मी गाडींतून उतरतांच वळेंच हसून तिला म्हटलें—

" आज ही भेटायला आली आहे तुला ऊर्मी ! "

" मला भेटायला आल्या आहेत ह्या ? "

" होय. तुम्ही परवानगी द्याल का यांना माझ्याबरोबर उस्मानशहाच्या दर्शनाला जायला ? "

ऊर्मिलेने माझ्याकडे बघितलें.

मी चहा तयार करण्यांत गर्क झालों होतों.

चहाचे पेले भरून मी त्या दोघींपुढे ठेवले; व बशींतील ' उन्हउन्हीत शंकरपाळा तोंडांत टाकून चहा घ्यावयाला सुरवात केली.

ऊर्मिलेने चहाचा एक घोट घेतला आणि माझ्याकडे बघून विचारलें, " केव्हा जायचंय् दर्गा पहायला ?— "

" आताच चहा घेतल्याबरोबर निघायचंच. तुम्ही परवानगी दिलीत की निघूं आम्ही— "

" माझी परवानगी आहेच त्यांना !—"

" मग निघायचं लगेच बरं का आपण ! "

अमीनाने चहा घाईघाईने संपवीत म्हटलें.

तिला काय उत्तर द्यावें, हें मला समजेना.

इतक्यांत ऊर्मिलेने विचारलें, " पण येणार केव्हा परत तुम्ही ?—"

" दर्शन घेतल्याबरोबर परत येऊं लगेच आठच्या सुमाराला.--नाही अमीना ?—"

" हो, थांबून काय करायचंय् आपल्याला तिथं ?—"

आणि खरोखरीच आम्ही चहा घेतल्याबरोबर निघालों.

* * *

आम्ही दर्ग्यापाशी जाऊन पोचलों, त्या वेळीं काळोख पडावयाला सुरवात झाली होती.

सप्तमीच्या चंद्राच्या छायाबहुल, सौम्य प्रकाशांत दर्ग्याच्या पांढऱ्या घुमटाचा मळकटपणा लोपून जाऊन तो आणि त्याच्या भोवताली असलेले चारी मनोरे रमणीय दिसत होते. दर्ग्याच्या आसपास सर्वत्र लहान मोठीं थडगीं होतीं. पाऊस उडून गेल्यामुळे अर्धवट वाळलेलें गवत त्या थडग्यांतून जागोजाग उगवलें होतें. मृत्यूच्या त्या भयाण निवासस्थानाची स्तब्धता रातकिडयांच्या आवाजामुळे अधिकच भयाण वाटत होती. आम्ही दर्ग्याच्या आवारांत प्रवेश केला, त्या वेळीं त्याचा तो काळया पाषाणांनी बांधलेला प्रचंड पडका दरवाजा पाहून माझें मन अगदी उदास होऊन गेलें. मोगऱ्याच्या फुलांचा मादक सुवास सर्वत्र पसरला होता; व त्या सुवासांत मनाला गुदमरवून सोडणाऱ्या उदाच्या गंधाची छटा मिसळलेली होती. भोवताली पसरलेली तीं काळीं पांढरीं थडगीं, तो भयानक काळाभोर दरवाजा, तो चमत्कारिक उग्रमधुर गंध, रातकिडयांची ती एकतान किरकिर आणि त्या झाडांच्या लांब लांब हलत्या सावल्या—माझें मन कसल्या तरी अबोध भावनेने व्याकुळ होऊन गेलें.

मी अमीनाकडे पाहिलें—तिची अगदी तंद्री लागून गेली होती. तिच्या त्या भावपूर्ण बालिश डोळ्यांपुढे कसलें तरी दिव्य स्वप्न तरंगत होतें.

आम्ही दर्ग्याच्या मुख्य इमारतींत आलों, तेव्हा समोर धुरकटलेला कंदील ठेवून बसलेला एक जख्खड म्हातारा मुसलमान आमच्या दृष्टीस पडला.

आम्हाला पाहतांच तो मोठ्या कष्टाने उठून उभा राहिला आणि त्याने कुर्निसात् केला.

अमीनानें त्याला आमच्या येण्याचा उद्देश सांगितला.

त्याबरोबर तो म्हणाला, " बाई, तुम्ही उशीर केलात यायला थोडासा. आताच दर्ग्याचं दार बंद केलं मी. आता उद्या पहाटेशिवाय दर्शन नाही व्हायचं तुम्हाला ! वाटल्यास दाराच्या जाळींतून दर्शन घ्या—"

" असं काय करतां मियाजी ? आम्ही इतक्या लांबून दर्शनाला आलों. तुम्ही थोडा वेळ दार उघडा न् दर्शन घेऊन जाऊं द्या आम्हाला. "

मी खिशांतून रुपाया काढून तो बोटांवर नाचवीत म्हटलें.

" नाही जी ! आता तुम्हाला पहाटेशिवाय दर्शन घडणार नाही. इथला कायदाच आहे तसा.—एकदा दार लागल्यावर तें उघडतां येत नाही पहाटे-पर्यंत आम्हाला—"

" मग काय करायचं अमीना ?—"

मी इतका वेळ अगदीं स्तब्ध उभ्या असलेल्या अमीनाकडे वळून विचारलें.

" थांबायचं पहाटेपर्यंत इथं—"

" तें कशाला ? आपण आता परत जाऊं न् पहाटे पुन्हा येऊं-"

" नाही भाई ! मी आज दुपारीं निजून उठल्याबरोबर बोलून चुकलें की, पीरसाहेबांसमोर मुजरा केल्याशिवाय घरीं परत येणार नाही ! काय झालं आजची रात्र आपण इथं राहलों तर भाई ? तुम्ही वाटल्यास गाडी पाठवून द्या परत ! म्हणजे बाईंना काळजी वाटायला नको उगाच !—"

ती हें मला सांगत होती, त्या वेळीं माझ्या डोळ्यांपुढे ऊर्मिलेची मघांची ती त्रस्त गंभीर मुद्रा दिसत होती.

" — पण ऊर्मिलेच्या मनांत उगाच कांही तरी येईल, अमीना !—"

मी शेवटीं निरुपायानें स्पष्ट बोललों.

तिनें एकदम माझा हात घट्ट धरला आणि म्हटलें, " गिरिधर, तुम्ही खरोखरीच भाई आहांत माझे ! असं भलतंच कसं येईल त्यांच्या मनांत ?-"

तिच्या त्या उद्गारांवर काय बोलावें, हें मला समजेना.

दर्ग्याच्या आवारांत शिरल्यापासूनच माझ्या लक्षांत आलें होतें की, ती आज अगदी निराळ्या मनःस्थितींत आहे;—तिचें मन कसल्या तरी उच्च, अतींद्रिय जगांत संचार करीत आहे.

" मग गाडी पाठवून देतों मी घरीं ! पण आपण राह्यचं कुठं ?– "

" इथंच—या दर्ग्याच्या ओवऱ्यांत राहूं ! मी सारी रात्र जागणार आहे आज न् पीरसाहेबांचं चरित्र ऐकणार आहे ! हा बुड्ढा करील आपली सारी व्यवस्था—"

तिच्या त्या बोलण्यावर कांही उजरच नव्हता. मी मुकाट्याने उठून एक चिठी खरडली; व ती ड्रायव्हर जवळ देऊन त्याला घरीं परत पाठवला.

ती रात्र आम्ही दोघांनी, तिने ठरविल्याप्रमाणे, खरोखरीच जागून काढली. तिचें मन कसल्या तरी विलक्षण तंद्रींत हेलावत होतें; व ज्यांना कांही शेंडा बुडखा नव्हता, अशा पीराविषयीच्या नाना प्रकारच्या गोष्टी ती त्या बुड्ढ्याबरोबर बोलत होती. मी अंथरुणावर पडून त्यांचें तें विचित्र पण विलोभनीय संभाषण ऐकत होतों. माझ्या मनाला सारखी एकच भावना डिवचीत होती,--ऊर्मिलेला काय वाटत असेल ?—

त्याबरोबरच दुसराहि एक विचार माझ्या मनांत राहून राहून येई—नाचगाण्यावर पैसा मिळवणारी अमीना,— पण हिचें मन किती निष्पाप आहे ?

पहाटेच्या सुमारास माझा डोळा लागला. पण दर्ग्याचें दार उघडल्याबरोबर ती माझ्याजवळ आली आणि माझ्या केसावरून हळूच हात फिरवून तिने मला उठविलें, आणि म्हणाली—

"भाई, उठा ! मी आता मुजऱ्याला बसणार आहे !—"

मी टांक्यावरून तोंड धुवून दर्ग्याच्या आवारांत आलों. दिव्याच्या मंद प्रकाशांत हिरवी चादर आणि मोगऱ्याच्या माळा घातलेला तो दर्गा बघून माझेंहि मन कसल्या तरी अननुभूत भावनेने भरून आलें.

रुपयांनी भरलेलें चांदीचें सुंदर तबक अमीनेने त्या दर्ग्यापुढे ठेवलें आणि मुजरा करून तंबोऱ्याच्या तारा छेडल्या.

सूर्याचे तिरपे लांबच लांब पिवळसर किरण दर्ग्यावर येऊन पडेपर्यंत तिचें गायन चाललें होतें.

मी तिच्या अनेक मैफली ऐकल्या होत्या. पण आजच्यासारखा रंग तिच्या गाण्याला भरलेला मी कधीहि पाहिला नव्हता.

शेवटची भक्तिरसपर भैरवी म्हणतांना तिच्या डोळयांतून अश्रूंच्या धारा चालल्या होत्या.

ती भैरवी संपतांच अमीनेने तंबोरा खालीं ठेवला; आपले डोळे पुसले आणि क्षणभराने माझ्याकडे वळून ती उद्गारली--

" भाई, आता माझ्या मनाला कसं अगदी शांत झाल्यासारखं वाटतंय्—"

" माझ्याहि मनाला तसंच वाटतंय्—"

" खरं?--"

" हो. असलं दिव्य गाणं मी तुझ्या तोंडून आज पहिल्यांदाच ऐकलं अमीना!—"

मी तिचा अद्याप तंबोऱ्यावर असलेला हात एकदम घट्ट धरून म्हटलें.

पण दुसऱ्याच क्षणाला ऊर्मिलेचे ते सरोष, साशंक डोळे आपल्याकडे पहात आहेत, असा भास मला झाला.

आणि तिच्या संगीताची ती स्वर्गीय तंद्रा भंग पावली.

—जून १९३९

# ५ : : : : प्रचारक

त्याने बंगल्याच्या व्हरांड्यांत पाऊल ठेवतांच तिथे बैठ्या मेजाजवळ कुळांशीं घासाघीस करीत बसलेल्या वयस्क कारकुनाने चष्म्याच्या भिंगांतून त्याच्याकडे आपली नजर रोखून विचारलें, " काय पाहिजे तुम्हाला ? "

" मला वकीलसाहेबांना भेटायचंय् !"

" ते नऊ वाजल्याशिवाय बाहेर यायचे नाहीत. काय काम असेल तें मलाच सांगा--"

" माझं काम त्यांच्याशींच आहे, त्यांनाच भेटलं पाहिजे मला--"

" मग या एक तास दीड तासानं--"

कारकुनाने त्याच्याकडे तुच्छतेने पाहून पुन्हा कुळांशीं बोलावयाला सुरवात केली.

त्याने भिंतीला लावलेल्या मोठ्या घड्याळाकडे बघितलें. त्यांत अद्याप नऊ वाजावयाला पाऊण तास होता. तो पाऊण तास कसा आणि कुठे जाऊन घालवावा, हें त्याला सुचेना. स्टेशनवरून पायींच चालत आला होता तो. गाडींतील रात्रीच्या जागरणानंतर तीन चार मैलांची पायपीट केलेले त्याने

पाय व पडशींतील पुस्तकांचें ओझें वाहून शिणलेलें शरीर आता आणखी श्रम करावयाला अगदी नाखूष होतें.

शिवाय त्याचा विचार साधल्यास वकीलसाहेबांकडेच मुक्काम करावयाचा होता.

म्हणून त्याने कारकुनाला पुन्हा एकवार आर्जवाने विचारलें, " माझं एवढं पत्र नेऊन देतां का वकीलसाहेबांना ? "

" मी सांगितलं ना एकदा तुम्हाला ते नऊशिवाय भेटायचे नाहीत म्हणून ? त्यांची पूजा न् जप झाल्याशिवाय ते कुणाचीहि चिठीचपाटी पहात नसतात ! काय ताप आहे या लोकांचा ! जसा काय लाख दीड लाखांचा दावा घेऊन आले आहेत तोंडांतून शब्द बाहेर पडल्याबरोबर वकीलसाहेबांची भेट व्हायला !—"

" वकीलसाहेब बाहेर येईपर्यंत मला इथं बसायला तर हरकत नाही ना तुमची ? "

" बसा की ! नको कोण म्हणतो ? हें जाजम त्यासाठीच घातलेलं आहे. पण पुन्हा प्रश्न मात्र विचारूं नका्कांही—"

आणि त्या कारकुनाने खालच्या आवाजांत कुळांशीं बोलावयाला सुरवात केली.

त्याने खांद्यावरील पडशी उतरून जाजमाच्या एका टोकाला बैठक मारली; व चंची बाहेर काढून तंबाकूचा बार भरला. नंतर पडशींतून लठ्ठ पुस्तकांचा भारा काढून एकंदर नग किती आहेत ते मोजले, आणि आपल्या खिशांतून हिंदुधर्मरोजनिशी काढून तींत लिहावयाला प्रारंभ केला.

लिहिणें पुरें झाल्यावर त्याने पुन्हा एकदा तंबाकूचा बार भरला; व घड्याळ्याकडे पाहिलें. सवा नऊ झाले होते आता. म्हणून, तो कारकुनाला पुन्हा विचारणार, तोंच दारावरील पडदा बाजूला सारून वकीलसाहेब बाहेर आले.

टक्कलांत सामील झालेल्या त्यांच्या उंच कपाळावर दुबोट केशरी गंध

आढवें लावलेलें होतें; व भुवयांच्या मधल्या जागेंत शेंदूर भरलेला होता. एखाद्या जुनाट देवळाच्या अंधाऱ्या गाभाऱ्यांत गेल्यावर गंध–फुलें–ऊद वगैरें-च्या संमिश्र वासाचा जो एक कोंदट भपकारा अंगावर येतो, त्याची झुळूक त्यांच्या आगमनाबरोबर म्हऱाड्यांत फैलावली. जाजमावर बसलेल्या कुळांनी त्यांना उठून खडी ताजीम दिली.

पण, जणु कांही त्यांच्या अस्तित्वाची आपल्याला जाणीवच नाही, अशा आविर्भावाने ते खुर्चीवर विराजमान झाले. त्याबरोबर कारकून लगबगीने मिसल घेऊन त्यांच्याजवळ आला.

तोंच तो एकदम टेबलाजवळ जाऊन उभा राहिला; व हात जोडून वकीलसाहेबांना म्हणाला, " वेदांततीर्थांनी मला पत्र देऊन आपल्याकडे पाठ-वलं आहे—"

" कुठं आहे पत्र ?" वकीलसाहेबांनी भुवया चढवून त्याच्याकडे पहात विचारलें.

त्यांच्याशीं अशा रीतीने लगट करण्याचें त्याचें धार्ष्ट्य पाहून अंतरावर अदबीने उभीं असलेलीं कुळेंहि त्याच्याकडे विस्मयाने बघूं लागलीं.

त्याने घाईघाईने आपल्या खिशांतून एक मळका लिफाफा बाहेर काढला; व तो टेबलावर ठेवला.

त्याबरोबर वकील कारकुनाला म्हणाले, " नारोपंत, पहा बरं काय म्हणतात वेदांततीर्थ तें—"

नारोपंतांनी तें पाकिट फोडून त्यावर ओझरती नजर टाकली व किंचित् हसून ते वकीलसाहेबांना म्हणाले, " यांना प्रचारार्थ पाठवलं आहे वेदांततीर्थांनी— "

" आता कसला प्रचार शिल्लक राहिला आहे अजून ? गेल्या वर्षी वेदांत-तीर्थांनी तब्बल महिनाभर आपल्याकडे मुक्काम ठोकून व्याख्यानं झोडलीं–"

" पण अद्याप पुस्तकांचा प्रचार शिल्लक राहिला आहे—"

" मी मुद्दाम आलों आहें, तो वेदांततीर्थांनी काढलेल्या 'धर्मदीपिका'

या मासिकाच्या प्रचारासाठी— "

त्याने मुद्दाम मध्ये बोलून खुलासा केला.

" कोणतं ? तें गेले सहा महिने आमच्याकडे येतंय् तें का ?" कारकुनाने विचारलें.

" म्हणजे ? तुम्ही कधी सोडवलीत व्ही. पी. त्याची ? मी तर अद्याप एकहि अंक पाहिला नाही त्याचा--"

" आपल्याला वेळ तरी कुठं आहे असलीं मासिकं पाहयला ?- गेले सहा महिने येताहेत अंक त्याचे-- "

" हें त्याचं सहा महिन्याचं बांधीव पुस्तकच आणलंय् मी आपल्यासाठी— "

" नारोपंत, घेऊन ठेवा तें पुस्तक ! मग काय म्हणणं आहे तुमचं?—"

" वेदांततीर्थांनी लिहिलंच आहे सारं आपल्या पत्रांत-- "

" मग असं करा ! –माझ्या मागं सध्या काम आहे फार. उद्या पोळयाची सुट्टी आहे कोर्टाला. तेव्हा सकाळीं याच वेळेस या पुन्हा. म्हणजे स्वस्थपणानं बोलूं आपण. तोंपर्यंत रात्रीं मी हें पुस्तकहि चाळून ठेवीन तुमचं ! गेल्या वर्षीं वेदांततीर्थ इथं बऱ्याच मंडळींना जाऊन भेटले होते. त्यांची यादी असेलच तुमच्याजवळ त्यांनी दिलेली ! तर आज भेटून घ्या जमेल तितक्या लोकांना ! हं नारोपंत--"

आणि त्यांनी कारकुनाकडे वळून कामाची माहिती घ्यावयाला प्रारंभ केला.

त्याने मुकाट्याने जाजमावर ठेवलेली पडशी खांद्यावर टाकली व तो बाहेर पडला. वकीलसाहेब त्या शहरांतील हिंदुसभा आणि वर्णाश्रम स्वराज्य-संघ या दोहोंचेहि अध्यक्ष होते. वेदांततीर्थांनी त्याला असें निक्षून सांगितलें होतें की, ते मोठे उदार असून माझें पत्र पाहिल्याबरोबर तुला आपल्या घरीं ठेऊन घेतील. पण, तो स्टेशनवरून आलेला दिसत असतांना सुद्धा, त्याची अवाक्षरानेहि विचारपूस न करतां, वकीलसाहेबांनी त्याला अगदी संभावितपणाने वाटेला लावलें.

श्रावणांतील दमट ऊन आता अगदी चांगलेंच तापलें होतें. त्याच्या अंगांतून घामाच्या धारा लागल्या. त्याला कुठे जावें हें समजेना. शहराबाहेर एका टोकाला असलेल्या या गावठी धंतोलींत तो स्टेशनवरून परस्पर आला होता. त्याच्या खिशांत पुरता एक रुपयाहि नव्हता. कारण, वेदांततीर्थांनी त्याला अगदी खात्री दिली होती की, वकीलसाहेबांकडे गेल्याबरोबर तुझी सारी सोय होईल.

आता तेथून बाहेर पडल्यावर कुठे तरी जाणें व आपली सोय करून घेणें त्याला प्राप्तच होतें. म्हणून तो शहराकडे जाण्याच्या विचाराने चालावयाला लागला. एक दोन बंगले टाकून तो पुढे जातो न जातो, तोंच त्याच्या मनांत कल्पना आली की, नाही तरी या रस्त्याने आपण जातोंच आहोंत, तर वेदांततीर्थांनी दिलेल्या यादींप्रमाणे जातां जातां थोडेंसें प्रचारकार्य करून पाहूं. निदान दिवसभराच्या खर्चापुरते तरी पैसे आपल्या हातीं येतील.

म्हणून, तो समोर जो बंगला दिसला, तिकडे वळला. त्याने आतापर्यंत पाहिलेल्या बंगल्यापेक्षा या बंगल्याची बांधणी अधिक सुबक असून, त्याच्या भोवती टुमदार बगीचाहि होता. तो प्रवेशद्वाराच्या अगदी जवळ गेला; व त्या दाराच्या खांबावर बसविलेल्या संगमरवरी पाटीवरील नांव त्याने वाचलें—

**— लेफ्टनंट कर्नल आर० के० चितळे —**

तें नांव वाचल्याबरोबर प्रथम तर तो चरकलाच. इथे जाऊन कांही उपयोग होणार नाही, अशी शंका त्याच्या मनांत आली; व तो परत फिरला. पण लगेच त्याला आठवलें की, वेदांततीर्थांनी दिलेल्या यादींत आपण हें नांव वाचलेलें असून, या गृहस्थासंबंधी ते आपल्याजवळ अनुकूल बोललेहि होते. लेफ्टनंट कर्नल असला, तरी हिंदु, त्यांतून ब्राह्मण आहे; कदाचित् काम होईलहि.

तो प्रवेशद्वाराच्या दिंडींतून बंगल्यांत शिरला. त्याबरोबर चपराशाने पुढे येऊन त्याला हटकलें. तेव्हा, त्याने कर्नलसाहेबांच्या भेटीसाठी आपण आलों असल्याचें त्याला सांगितलें; व खिशांतून परिचय-पत्रिकाहि काढून त्याच्या हातीं दिली.

चपराशाने ती पत्रिका दोन तीनदा उलटीपालटी केली व त्याच्याकडेहि दोन तीनदा खालवर न्याहाळून पाहिलें. जणु कांही ती गुळगुळीत कागदावर छापलेली सुंदर पत्रिका आणि त्याच्या अंगावरील खादीचे मळके विटके कपडे यांच्यांतील फरकाने त्याचें मन क्षणमात्र गोंधळून गेलें.

पण अखेर त्या चपराशाने व्हरांडयांतील बाकावर त्याला बसविलें आणि ती पत्रिका घेऊन तो आंत गेला.

थोडया वेळाने बाहेर येऊन त्याने सांगितलें की, " साहेबांनी तुम्हांला आंत बोलावलें आहे. "

त्या चपराशाच्या मागोमाग तो आंत गेला.

दिवाणखान्याला लागून असलेल्या प्रशस्त खोलींत एका छोट्या टेबला-पाशी कर्नलसाहेब बसले होते. त्यांच्या अंगावर लष्करी पोषाख व तोंडांत चिरूट होता.

त्याने आंत आल्याबरोबर त्यांना नमस्कार केला. त्यांनी समोरच्या खुर्चीकडे बोट केलें.

तो आपल्या पडशींतून पुस्तकें काढीत असतां कर्नलसाहेब म्हणाले, " तुम्ही माझ्याकडे कसे आलांत ? मी कोण आहे हें माहीत आहे ना तुम्हाला?"

तो प्रश्न विचारीत असतां त्यांच्या जाड, काळसर ओठांभोवतीं स्मिताच्या सुरकुत्या उमटल्या. खेळ करण्याच्या तयारींत असलेल्या डोंबाऱ्याकडे मनुष्य ज्या तुच्छतामिश्र कुतूहलाने पाहतो, तें कुतूहल त्यांच्या नजरेंत खेळत होतें.

" होय. आपल्या नांवाची पाटी वाचल्यावर पूर्ण विचार करूनच मी आंत आलों. " त्याने नम्रपणाने म्हटलें. " वेदांततीर्थांच्या सांगण्यांत असं आलं होतं की, आपण त्यांच्या व्याख्यानाला हजर राहिलं होतां व पुस्तकेंहि विकत घेतलीं होतीं—"

" खरं आहे तें. पण त्याचा अर्थ असा मात्र नव्हे की, मला त्यांचीं मतें पटलीं. ते एक दिवस माझ्याकडे आले व आपल्या व्याख्यानाला हजर राहण्याविषयी त्यांनी मला फार गळ घातली. म्हणून मी त्या दिवशीं संध्या-

काळीं त्यांच्या व्याख्यानाला गेलों.—"

" मग काय वाटलं आपल्याला त्यांचं व्याख्यान ऐकून ? "

" त्यांचं वक्तृत्व छान आहे; व जुन्या धर्मशास्त्राचं अध्ययनहि चांगलं असावं. पण, त्यांनी जें काय थोडंसं इंग्रजी वाचलंयू, तें त्यांना समजलेलं दिसत नाही—"

" ते पंजाब युनिव्हर्सिटीचे पदवीधर आहेत— "

" होय. मला माहीत आहे तें. पण, मनुष्य ग्रॅज्युएट असला, तरी त्याला इंग्रजी वाङ्मय कळतंच असं नाही. तुमच्यांतल्याच एका सनातनी ग्रॅज्युएट पंडितानं पाश्चात्य शास्त्रज्ञांचे मोठे उताऱ्यावर उतारे देऊन जुन्या हिंदु समाजरचनेची तरफदारी करणारा एक ग्रंथ लिहिला आहे ना ? त्यांत त्यानं पाश्चात्य शास्त्रज्ञांच्या विधानांचा जो उपयोग अज्ञानानं न् लबाडीनं केला आहे, त्याबद्दल खरोखरी नोबेल पारितोषिक दिलं पाहिजे त्याला ! तुमचे वेदांततीर्थही त्याच कोटींतले आहेत, अशी खात्री झाली माझी त्यांचे ग्रंथ वाचून—"

या भडिमाराने तो अगदी चीत होऊन गेला; व आपण नमस्कार करून मुकाट्याने कर्नलसाहेबांचा निरोप घेऊन निघून जावें, अशी कल्पना त्याच्या मनांत आली.

तोंच कर्नलसाहेबांनी त्याला विचारलें, " का हो, तुम्ही स्वत: कोणत्या मताचे आहांत ?— तुमच्या डोक्यावर गांधी टोपी दिसते म्हणून विचारतों मी ! वेदांततीर्थांनी तर गांधींना सपाटून शिव्या दिल्या आहेत आपल्या पुस्तकांत— "

" माझ्या डोक्यावरली टोपी न् माझ्या पडशींतलीं पुस्तकं यांचा कांही संबंध नाही माझ्या मताशीं ! मी आपला एक उपजीविकावादी माणूस आहे, साहेब ! गरिबांना मतं नसावींत, असं मत आहे माझं !—"

त्याचें तें उत्तर ऐकून साहेब मन:पूर्वक हसले; व नंतर त्याला म्हणाले, " बरं, बोला तुमचं काय काम आहे तें ? "

" वेदान्ततीर्थांनी हें नवीन मासिक काढलंय् गेल्या संक्रांतीपासून, " त्याने अंक पुढे ठेवीत म्हटलें.

" वर्गणी काय आहे त्याची ?" त्यांनी अंकाकडे न पाहतांच विचारलें.

" चौसष्ट पृष्ठांच्या मानानं साडेचार रुपये कांही फार नाहीत. असलीं मासिकं कोण घेतो ? म्हणून खर्च भरून काढण्यासाठी वर्गणी थोडी जास्त ठेवावी लागते—"

" खरं आहे तुमचं म्हणणं ! असलीं मासिकं अजिबात न निघण्याचा काळ ज्या दिवशीं येईल तो सुदिन ! बरं, तुमचं कमिशन किती आहे यांत?—"

" मला दर वर्गणीदारामागं सामान्यतः एक रुपया कमिशन मिळायचं आहे, साहेब— "

" ठीक, ठेवा मग ते अंक. मी करमणुकीसाठी चाळीत जाईन मधून मधून—"

घंटी वाजवून त्यांनी चपराशाला बोलावलें व मनीबॅग मागवून त्याच्या हातांवर वर्गणी ठेवली.

त्याबरोबर तो उठला व त्याने अदबीने त्यांना नमस्कार केला.

तेव्हा कर्नलसाहेबांनी हसून म्हटलें, " गैरसमज करून घेऊं नका ! माझी मदत तुमच्या उपजीविकावादाला आहे ! या धर्मदीपिकेला नाही. या दीपिकेंतून प्रकाशाऐवजीं काजळीच बाहेर पडत असेल फार—"

तो पडशी खांद्यावर टाकून संतुष्ट चित्ताने बाहेर पडला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो बरोबर नऊ वाजतां वकीलसाहेबांकडे हजर झाला. त्याच्या सुदैवाने ते त्याच वेळीं बाहेर येऊन बसले होते.

त्याच्या नमस्काराचा स्वीकार मानेच्या आदबशीर आकुंचनाने करून वकीलसाहेब किंचित् हेल काढून विचारते झाले, " मग काल किती ठिकाणीं गेलां होतात ?"

" काल दहा ठिकाणीं गेलों होतों एकंदर. त्यांपैकी चौघांनी ' असल्या

मासिकाची कांही गरज नाही, ' असं सांगून मला वाटेला लावलं. पांच जणांनी अंक पाहण्यासाठी ठेवून घेतले आहेत आपल्याप्रमाणं; न् फक्त एकानंच रोख पैसे ठेवले माझ्या हातावर. आपल्या पलीकडल्या बंगल्यांत राहणारे ते लेफ्टनंट कर्नल—"

" काय ? तो चितळे वर्गणीदार झाला म्हणतां तुमच्या मासिकाचा ? झूट, अगदी झूट गोष्ट ! मी कधी खरी मानणार नाही— "

वकीलसाहेब एकदम चवताळून उद्गारले.

त्यांच्या त्या चवताळण्याची त्याला फार गंमत वाटली; पण तो नम्रपणानें म्हणाला, " आपल्याजवळ खोटं बोलून मला काय मिळवायचं आहे, साहेब ? ही पहा पावती त्यांच्या नांवाची— "

ती पावती बघून वकीलसाहेब अधिकच चेकाळले; व त्याच्या अंगावर खेकसून म्हणाले, " हो हो ! दिले असतील पैसे ! पण त्याच्याकडे गेलांत कसे तुम्ही ? शिव शिव ! काय माणूस आहे तो ! मांसमच्छी खाणारा न् वाटेल तें पिणारा ! वेदान्ततीर्थांच्या एका व्याख्यानाच्या वेळीं उपवक्ता म्हणून बोलायला उभा राहिला तो; न् गवालंभाचे आणि उत्तररामचरिताचे दाखले देऊन पूर्वींचे ब्राह्मण गोमांस खात असत असं बिनदिक्कत सांगितलं त्यानं सभेंत ! मी अध्यक्ष म्हणून त्याला दाबायला गेलों, तर माझीहि हवी तशी टिंगल केली त्यानं ! छे, छे, कसं जाववलं तुम्हांला त्या माणसाकडे !—"

" हें पहा, मी आहें उपजीविकावादी. मी त्यांच्याकडे सहजगत्या म्हणून गेलों न् या उभ्या शहरांत तेवढाच एक माणूस माझ्या हातावर रोख पैसे ठेवणारा निघाला !—"

" काय करतां त्याचे ते रोख पैसे घेऊन ? पैसे कोणापासून घ्यायचे, याला तरी कांही सुमार आहे कीं नाही ? ' याच्ञा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ' हें कालिदासाचं वचन वेदान्ततीर्थांच्या तोंडून कधी कानांवर पडलंय् कीं नाही तुमच्या ?— "

वकीलसाहेबांचें तें आवेशपूर्ण भाषण ऐकत असतांना त्याला आठवण

झाली,— एका मुसलमान पोलिस सबइन्स्पेक्टरावरील जबरीसंभोगाच्या खटल्यांत त्यांनी त्या इन्स्पेक्टराच्या वतीने काम केलें होतें या गोष्टीची! पण त्याने विचार केला, आपण गरजू आहोंत; कशाला उगीच वाद वाढवा?

म्हणून त्याने हळूच विचारलें, "मग आपलं कसं काय?—"

"आमचं काय असायचंय्? गेले सहा महिने येतच आहे मासिक आमच्याकडे. वेळ सापडला म्हणजे चाळीत जाईन अंक मधून मधून! —"

"मग पावती फाडायची ना?"

आणि त्याने खिशांतून पावतीपुस्तक काढलें.

तोंच वकीलसाहेब घसा साफ करून उद्गारले, "हें पहा, पावतिबिवती फाडण्याचं तूर्त राहूं द्या! थोडं स्पष्ट बोलतों, त्याचा राग मानूं नका हं!–आमच्याजवळ तसं आंतबाहेर कांही नाही.–वेदान्ततीर्थांचा हा नवा उद्योग कांही पसंत नाही आपल्याला! मी काल रात्रीं क्लबांतून आल्यावर सहज दोनतीन अंक चाळून पाहिले. वेदान्ततीर्थ अलिकडे बरेच सुधारक झालेले दिसताहेत! अहो, एका अंकांत सकेशा ब्राह्मण विधवांच्या पंढरपूरच्या विठोबाचं पादस्पर्शपूर्वक दर्शन घेण्याच्या हक्काची तरफदारी केली आहे त्यांनी! मी वर्णाश्रम–स्वराज्य–संघाचा अध्यक्ष आहें, हें माहीतच आहे तुम्हांला! आम्हांला कांही असलीं मतं पसंत पडणं शक्य नाही. पाठवीत चला मासिक कांही दिवस! वर्गणीचं मागाहून पाहूं! —अरे नारोपंत, सुपारी आणा बरं लवकर! बाकी कांही म्हणा, तुम्ही या चितळ्याकडे गेलांत, हें कांही ठीक नाही केलंत बुवा!—"

नारोपंतांनी पितळेच्या कळकट पानदानांतून आणलेल्या तांबड्या सुपारीचें लहानसें खांड त्याने तोंडांत टाकलें.

आणि, "याच्ञा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा" हें वकीलसाहेबांच्या तोंडून ऐकलेलें सुभाषित गुणगुणत, तो त्यांच्या बंगल्यांतून बाहेर पडला.

—मे १९३७

## ६ : : : पिंपळाचें झाड

त्या पिंपळाच्या झाडाकडे पाहिलें, म्हणजे माझें मन अगदी उदास होऊन जात असे.

आमच्या गावांत कांही तेवढेंच पिंपळाचें झाड होतें, असें नाही. गावाच्या शिवेवर जें मारुतीचें छोटें देऊळ होतें, त्याची स्थापना पिंपळाच्या पारावरच केलेली होती; व गावांतील बाजारपेठेंत जें सुंदर राममंदिर होतें, त्याच्या भोवतालच्या बगीचांतहि एक लहानसा पिंपळ होता. पण आमच्या घराच्या मागच्या बाजूला असलेल्या त्या पिंपळाकडे पाहतांच माझ्या मनांत जी उदास विचारांची वर्दळ सुरू होई, ती त्या इतर झाडांकडे बघून कधीच होत नसे.

वास्तविक त्या झाडाखाली कोणाची समाधि नव्हती, देऊळ नव्हतें किंवा साधा ओटासुद्धा नव्हता. उलट त्याच्या त्या पांढुरक्या अजस्र गाठियाळ खोडाला अगदी बिलगून लहान लहान झोपड्या बांधलेल्या होत्या; व वरती त्याच्या फांद्यांवरील घरट्यांतून येरझाऱ्या करणाऱ्या घारींचें भेदक क्रंदन जसें सारखें कानांवर येत असे, तशीं खाली त्याच्या बुंध्याजवळच्या त्या झोपड्यांतून पोरांचीं रडणीं मधून मधून ऐकूं यावयाचीं. अर्थात् मनुष्यवस्तीपासून दूर

असलेलें एखादें मोठें थोरलें जुनाट झाड असें आपल्याला भयाण वाटतें, तसें या पिंपळाविषयी वाटावयाला कांहीहि कारण नव्हतें.

तरीसुद्धा माझें मन त्या झाडाकडे बघितल्यावर अगदी खिन्न होऊन जात असे. त्याच्या त्या सळसळणाऱ्या दाट पानांआडून दिसणारे पहाटेच्या आरक्त आकाशाचे लहान लहान तुकडे किंवा सूर्य मावळल्यावर संधिप्रकाशांतून उमटून दिसणारी त्याच्या हिरव्या काळसर विस्ताराची भीषणता हीं दोन्ही माझ्या मनाला सारखींच विषण्ण करीत असत. एखाद्या अजस्र अजगराच्या अंगावरले हजारो खवले जर हलूं लागले, तर तें दृश्य पाहून मनाची जी अवस्था होईल, ती माझ्या मनाची स्थिति त्याचीं तीं दिवसभर चुळबुळणारीं पानें बघून होत असे. त्याहीपेक्षा काळोख्या रात्रीं वारा अजिबात नसल्यामुळे त्याला येणारी विलक्षण निश्चलता पाहून माझें मन अगदी सुन्न होऊन जाई. त्याला बघून मला गंमत अशी फक्त एकाच वेळीं वाटे. ती म्हणजे त्याच्या पायथ्याशीं असलेल्या झोंपड्यांतून बाहेर पडणारीं धुराचीं छोटीं छोटीं वर्तुळें सकाळच्या कोवळ्या, धूसर उन्हांत त्याच्या गर्द पर्णराजींत गडप झालेलीं पाहतांना !

त्या दिवशीं रात्रीं मी जेवून शतपावली करीत असतां एकाएकी माझ्या कानावर रडण्याचा चोरटा आवाज आला. त्याबरोबर मी खिडकीजवळ जाऊन बाहेर पाहिलें. तेव्हा त्या झाडाच्या पायथ्याशीं असलेल्या एका झोपडीपाशी मिणमिणत्या कंदिलाच्या प्रकाशांत तीन चार माणसें आपसांत हळूहळू बोलत असलेलीं मला आढळलीं. दोन तीन स्त्रिया त्या झोपडीच्या दाराशीं बसून हुंदके देत होत्या; व त्यांपैकी एकीच्या हातांतील तांबड्या वस्त्रांत गुंडाळलेल्या मृत अर्भकाला त्यांतला एक इसम आपल्या हातांत घेण्याचा प्रयत्न करीत होता.

त्या बाईच्या रडण्याचा आवाज होता तो.

तिच्या हातांतून त्याने तें मूल घेतांच तिने एकदम गळा काढला.

तेव्हा तो इसम तिला म्हणाला, " अशी काय रडतीस येड्यावाणी ! समंधाचा बळी हाये हा ! तूं रडल्यानं कोप होईल ना त्याचा !— "

ते शब्द ऐकतांच माझ्या अंगावर एकदम शहारे आले. मला वाटलें,

यांनी तें अर्भक बळी तर दिलें नाही ? आणि ठाण्यावर जाऊन वर्दी देण्याचा विचार माझ्या मनांत उसळून आला.

म्हणून मी माडीवरून उतरून खाली आलों व समोरच्या झोपडीच्या दाराशीं उभ्या असलेल्या एका म्हाताऱ्या इसमाजवळ मूल कशाने दगावलें, याची चौकशी करावयाला सुरवात केली.

तेव्हा तो आश्चर्योन उद्गारला, " कशानं मेलं ? कांहीहि नाही झालं जी त्याला. या पिंपळाखालच्या वेटाळांत या दिवसामध्ये एकतरी तान्हं मूल आपसुख मरतं बघा दरसाल! —येथल्या समंधाचा बळी आहे हा !— "

त्याचे ते उद्गार ऐकून मला एकदम हायसें झालें.

तथापि मी त्याला विचारलें, " तरी पण या मुलाला कांही तरी झालं असेल ना ? तुम्ही कुणाला दाखवलं तर असेल कीं नाही तें ? "

" दाखवायचं कांही कामच नाही जी ! या महिन्यांत पोर आजारी पडलं, म्हणजे समंधाचा उतारा म्हणून बाजूला काढून ठेवायचं त्याला मुकाट्या-नं ! कसला आजार न् कसलं औषध ! या वेटाळांत नवे आलेले दिसतां तुम्ही ? तुम्हांला पाटलाची गोष्ट माहीत नाही झालेली दिसत आमच्या !—"

त्याच्या त्या बोलण्याने माझी उत्सुकता चाळवली गेली; व जरी ती समंधाच्या बळीसंबंधाची समजूत मला मूर्खपणाची वाटत होती, तरी मी म्हाताऱ्याला पाटलाची गोष्ट सांगावयाला उत्तेजन दिलें.

त्याने जी गोष्ट सांगितली, ती खरोखरीच फार भयानक होती.

तें पिंपळाचें झाड त्या गावाच्या एका काळच्या मालगुजाराच्या वाड्या-च्या रिठावर वाढलेलें होतें. अजूनहि त्या झाडाच्या आसपासची जागा खणली असतां मोठमोठे चिरे सापडतात, असें त्या म्हाताऱ्याने मला सांगितलें. तो पाटील समंध होऊन त्या झाडावर राहिला होता; व चैत्री पुनव झाल्यावर पहिल्या आठवड्यांत तो तान्ह्या मुलाचा बळी घेतो, अशी लोकांची समजूत होती.

" पण तान्ह्या मुलाचाच बळी काय म्हणून ? " मी त्या बुढ्याला विचारलें.

" त्याला कारणहि तसंच आहे जी महाराज ! " त्याने मला अगदी गंभीरपणाने उत्तर दिलें. " त्या पाटलानं एकामागून एक पांच लग्नं केलीं; पण त्याला कांही मूलबाळ झालं नाही. त्यानं पुष्कळ नवससायास केले; साऱ्या हिंदुस्थानभर फिरून यात्रा केल्या; पीराच्या दर्ग्यावर मोत्यांच्या झालरीची हिरवी चादर घातली; फार काय, पाऱ्याचं रसायनसुद्धा घेऊन पाहिलं ! — तें रसायन त्याच्या साऱ्या अंगावर उतून आलं महाराज ! पण त्यानं कांही हिंमत सोडली नाही. अखेर त्याला या समोरच्या टेकडीवरच्या पीराचा दृष्टान्त झाला की, तूं लग्न करून नवी बायको माझ्या दर्शनाला आण, म्हणजे तुला मूल होईल ! आणि पुत्रमुख पाहिला हपापलेल्या त्या पाटलानं वयाला साठी उलटल्यावर एक चवदा वर्षांची कोवळी पोर बाशिंग बांधून घरांत आणली !— "

" पण त्या पाटलाला आपल्याला मूल होईल असं वाटलं कसं त्या वयांत ?—"

" तें नका विचारूं तुम्ही ! गुरुचरित्रांत नाही का विटाळ गेलेल्या बाईला मूल झाल्याचा दाखला ! लग्नानंतर दीड वर्षानं त्या पाटलाला मुलगा झाला ! त्याच्या बारशाच्या दिवशीं नागपुराहून मुद्दाम हत्ती बोलावून पाटलानं केवढ्या थाटानं त्याला दर्शनाला नेलं पीराच्या !—"

" पण तो मुलगा त्याचाच होता का ?—"

" त्या संशयानंच तर अनर्थ केला सारा ! त्या पोरीच्या म्हाताऱ्या सवतींना कांही तिला मूल झालेलं पाहवलं नाही. त्यांनी असं उठवलं की, त्या पाटलाच्या जवान मुसलमान हुजऱ्यापासून तिला तो मुलगा झाला !— "

" आणि पाटलाला पटलं तें ?— "

" नाही. प्रथम प्रथम नाही पटलं; पण साठी उलटलेल्या आणि पांच बायका करूनहि मूल न झालेल्या म्हाताऱ्याला अचानक झालेला हा पुत्रलाभ गावांतल्या लोकांनाहि कांही मोठासा सरळ वाटला नाही आणि सारा गाव ती गोष्ट कुजबुजूं लागला तरीहि पाटलाचं मन बिथरलं नसतं ! पण एक दिवस सवतीसवतींच्या भांडणांत त्या पाटलाची तिसरी बायको त्याच्या तोंडावर हात

ओवाळून म्हणाली, " मुसलमानाच्या बीजाचं पोर स्वतःचं म्हणून वाढवीत बसण्यापेक्षा निसंतान झालेलं पुरवलं ! " ते तिचे हेटाळणीचे क्रूर शब्द पाटलाच्या अगदी जिव्हारीं झोंबले आणि त्या तिरमिरीसरसा बांळतिणीच्या खोलींत जाऊन त्यानं त्या अर्भकाचा गळा दाबला ! "

" त्या अर्भकानं काय केलं होतं बिचाऱ्या ? पाटलानं त्या हुजऱ्याला किंवा फार तर आपल्या बायकोला मारायचं होतं— "

" त्या दोघांचाहि खून पडायचा त्या वेळीं ! पण जवळच्या माणसांनी पाटलाला मोठ्या शिकस्तीनं आवरला ! तो हुजऱ्या बेपत्ता झाला त्याच वेळीं आणि आपल्या पदराखालचं पोर डोळयांदेखत ओढून मारलेलं बघून ती पोरहि हाय खाऊन मेली ! "

" आणि त्या पाटलाला कांही शिक्षा नाही झाली ? "

" शिक्षा करण्याच्या स्थितींत तो राहिलाच नाही मुळी ! त्याच्या डोळया-वरचा खून उतरतांच आपण केलेल्या त्या अघोर कर्माचा इतका कांही परिणाम त्याच्या मनावर झाला की, त्याला वेड लागलं ! पण तें वेडहि त्या कृत्याइतकंच भयंकर होतं ! कोणतंहि तान्हं मूल पाहिलं की, तो गळा दाबायला धावत असे त्याचा !—"

" मग पागलखान्यांत धाडला असेल त्याला ? —"

" नाही जी ! त्या वेळीं कुठले आले आहेत पागलखाने ? त्याला वाड्यांत-च एका खोलीमध्ये कोंडून ठेवला त्याच्या बायकांनी ! तो फारच बेफाम झाला, म्हणजे चिंध्यांचं मूल तयार करून त्याच्यापुढं ठेवीत ! त्याचा गळा तो जोरजोराने दाबीत असे आणि मग आपल्या हातांकडे पाहून ढसढसा रडत असे ! दर अवसेपुनवेला त्याचं वेड अनावर व्हायचं न् त्या वेळीं हा प्रकार घडायचा ! या स्थितींत दहा वर्षं काढलीं त्या पाटलानं न् अखेर हायहाय होऊन मेला ! चैत्राची पुनव होती म्हणतात त्या दिवशी ! "

" त्याच्या मागं कोणी वारस नव्हता त्याचं घर चालवायला ? —"

" वारस खंडीभर होते जी ! पण त्याच्या त्या सहाव्या बायकोनं मरतांना

तळतळून असा शाप दिला होता की, पाटलाच्या रिठावर दिवा लावायला शिल्लक नाही राह्यचं कुणी ! त्या भीतीनं आणि समंधाच्या धास्तीनं पाटील मेल्यावर तो वाडा ओस पडला आणि हें पिंपळाचं झाड त्याच्या रिठावर उगवलं ! याच्यावर राहून तो समंध बळी घेत असतो तान्ह्या मुलांचा ! ''

त्याचे ते उद्गार ऐकत असतांनाच माझी नजर सहज त्या झाडाकडे गेली. मनुष्य आणि झाड यांचा कांही संबंध? पण पुनर्जन्माची कल्पना आठवून माझ्या मनांत असा विचार आला की, त्या पाटलाचा अतृप्त दुर्दैवी आत्मा तर या झाडाच्या रूपाने स्वतःच्या वास्तूवर पुन्हा प्रकट झाला नसेल ना ?

आणि, माझें मन जें त्याच्याकडे पाहून इतके दिवस निष्कारणच उदास होत असे, त्याचेंहि कारण त्या झाडाच्या या भीषण पूर्वेतिहासाची मनावर न कळत पडलेली सावली तर नव्हे ?

ही कल्पना माझ्या मनांत येत आहे, तोंच कृष्णपक्षांतील पंचमीचा चंद्र वर येऊन त्या झाडाच्या आडून सृष्टीकडे हसतमुखाने पाहूं लागला.

आणि त्याच्या त्या हसऱ्या प्रकाशांत त्या पिंपळाचीं हजारो हिरवीं पानें वाऱ्याने सळसळून चम् चम् करीत नाचूं लागलीं !

मला आठवलें—

—मी चंद्रप्रकाशांत कधीच तें झाड पाहिलें नव्हतें !

—मे १९३९

## ७ : : : त्याची मुशाफरी

आम्ही दोघें स्टेशनवर आलों, त्या वेळीं एक्स्प्रेस यावयाला काय तो पंधरा मिनिटेंच अवकाश होता.

आमची ओळख झाल्याला आजचा तिसरा दिवस होता. मी बहुधा दर शनिवारीं खंडाळ्याला येत असे. आठवड्याचे पांच दिवस फर्मचें काम करून आलेला शीण खंडाळ्याच्या इंपीरियल काफेमध्ये सोमवार सकाळपर्यंत चैनीनें राहून घालवावयाचा, असा माझा क्रम होता. शनिवारीं सायंकाळीं झोपून उठल्यावर सुस्त झालेल्या मेंदूला ताजातवाना करण्यासाठी मी बारमध्ये गेलों असतां, ही स्वारी बारमेडशीं गुलगुल गोष्टी करीत उभी असलेली मला आढळली. मी जवळ जातांच तिच्या नाजूक बोटांशीं खेळत असलेला आपला हात त्यानें झटकन मागे घेतला; पण अगदी बेडरपणानें माझ्याकडे पाहून हसत हसत म्हटलें—

"हॅलो! गुड ईव्हनिंग!—"

आणि अशा रीतीने मदिरा आणि मदिराक्षी यांच्या साक्षीनें आमची ओळख झाली.

तो सिगारेट कंपनीचा प्रवासी प्रतिनिधि होता.

मी सॉलिसिटरच्या फर्ममध्ये दुय्यम होतों.

त्याचें आयुष्य जितकें धावतें, तितकेंच माझें बैठें होतें. सॉलिसिटरच्या फर्ममध्ये राहणाऱ्या माणसाला गांभीर्याचें कवच नेहमी आपल्या चेहऱ्यावर वागवावें लागतें. ती सवय झाल्यामुळे तारुण्याला स्वाभाविक असलेला जो कांही थोडासा अवखळपणा माझ्या अंगीं होता, तो बहुतेक गुदमरून मरून गेला होता. मी मद्य घेत असें, तरी मितपानी होतों. क्लबांतील शिष्टाचारामुळे मला प्रथम मद्य घेण्याची चटक लागली; व पुढे मेंदूला थकवा आल्यासारखें वाटलें म्हणजे एखाददुसरा चषक घ्यावा, असा माझा क्रम सुरू झाला; पण मद्य घेण्यांतहि उपयुक्ततेचीच दृष्टि मुख्य होती. मुंबईसारख्या शहरांत राहून-सुद्धा ज्याला ' निशाचरण ' (nocturnal life) म्हणतात, तें माझ्या हातून कधी घडलें नाही; व लग्नकार्यासारख्या प्रसंगीं होणाऱ्या नृत्यगायनाच्या बैठकीशिवाय कलावंतवर्गाशीं माझा कधीहि संबंध आलेला नव्हता.

माझ्या प्रवासी दोस्ताचें सारें आयुष्य याच्या अगदी उलट होतें. त्याचा प्रतिष्ठितपणा त्याच्या पाश्चात्य पोषाखांत जो काय असेल, तेवढाच; व त्या पोषाखाचाहि उपयोग तो आपले निरनिराळे ढंग निभावून नेण्याचें एक साधन म्हणूनच करीत असे, असें माझ्या पुढे अनुभवाला आलें. तिसऱ्या वर्गाचें तिकीट काढून दुसऱ्या वर्गाने प्रवास करणें किंवा निमगोऱ्यांच्या राखीव डब्यांत जागा मिळविणें, हा त्याचा नेहमीचा परिपाठ होता; पण त्याहीपेक्षा त्याच्या दृष्टीने महत्त्वाचा फायदा हा होता की, त्या पोषाखामुळे त्याला गोऱ्यांच्या किंवा निमगोऱ्यांच्या पानगृहांत आणि नृत्यगृहांत पुष्कळदा सुलभतेने प्रवेश मिळून त्या समाजांत निस्संकोच मनाने वावरतां येत असे. त्याचा वर्ण लालसर गोरा, डोळे निळसर पोपटी व केस पिंगट भुरे होते. त्यामुळे गोऱ्या समाजांत खपून जाणें त्याला फारसें कठीण पडत नसे.

आम्ही मेजापाशी बसल्यावर मद्याचा पहिला घुटका माझ्या घशाखाली उतरतो न उतरतो, तोंच त्याने मला इंग्रजींत विचारलें, " कशी काय वाटते ही छोकरी तुम्हांला ?"

" मला कांहीच कल्पना नाही तिच्यासंबंधी ! " मी चकारून उत्तर दिलें.

" हें पहा भलत्याच गोष्टी नका सांगूं मला ! या कार्फेत उतरणाऱ्या प्रत्येक रंगेल तरुणाशीं घसट आहे तिची !—"

ही त्याची लगट पाहून मी अगदी चीत झालों. खरोखरीच त्या मद्यांगनेकडे मी आजपर्यंत कधीच साभिप्राय पाहिलें नव्हतें. उलट, तिचे ते कापलेले केस, कोरलेल्या भुवया, रंगवलेले ओठ, अर्धावृत वक्षःस्थल आणि लांडा झगा पाहून, मला एक प्रकारची शिसारीच वाटत आली होती पहिल्यापासून तिच्याविषयीं. त्यामुळे माझ्या दोस्ताच्या त्या बोलण्याने मी अगदी सर्द होऊन गेलों.

" छे हो, माझं अगदी लक्ष्यसुद्धा गेलं नाही तिच्याकडे आजपर्यंत कधी!" मी प्रामाणिकपणाने कबुली दिली.

त्याबरोर तो इतक्या मोठ्याने आणि इतका मनःपूर्वक हसला की, मी अगदी खजील होऊन गेलों; व त्या बारमेडशीं आपली घसट नसावी, याबद्दल आजपर्यंत कधी न वाटलेली लाज मला आजच प्रथम वाटली.

" मदनाच्या राज्यांत कधीच मुशाफरी केलेली दिसत नाही तुम्ही ! मग दर आठवड्याला इथं येऊन करतां तरी काय ?" त्याने सिगारेटची केस माझ्यापुढे करून किंचित् कुचेष्टेने विचारलें.

" काय करतां म्हणजे ? विश्रांति घेतों !" मी सिगारेट शिलगावीत रागाने उद्गारलों.

" तें समेजलों हो ! पण विश्रांति म्हणजे काय दोनचार पेग झोकून नुसती झोप काढणं ? तें तर घरींसुद्धा करतां येतं ! त्याच्यासाठी इतक्या लांब या कार्फेत येऊन कशाला राहायला हवं दोन दिवस ? विश्रांति म्हणजे मनमुराद मजा करणं ! इतकी मजा की, आठवडाभर केलेल्या कामाचा अगदी पूर्ण विसर पडला पाहिजे आपल्याला;–नेहमीच्या रखडपट्टी जगांतून निघून गंधर्वलोकांत आपण वावरतों आहोंत, असं वाटलं पाहिजे मनाला ! ती खरी विश्रांति ! "

त्याची ती विश्रांतीची कल्पना मला चमत्कारिक खरी, पण आकर्षक

वाटली; व रात्रीं आपल्याबरोबर नृत्यगृहांत येण्याची विनंती जेव्हा त्याने मला केली, तेव्हां मी धडधडत्या हृदयाने तिला रुकार दिला.

प्रवासांतील मैत्रीचा एक विशेष असा असतो की, ती जितकी अल्पजीवी, तितकीच गाढ असते. आपल्या आयुष्यांतील जीं नाजुक रहस्यें आपल्या नित्याच्या बैठकींतील मित्रांशीं आपण सहसा बोलणार नाहीं, तीं प्रवासांत असतांना गाडींत किंवा विश्रांतिगृहांत भेटलेल्या माणसाशीं आपण पुष्कळदा सहजासहजीं बोलून जातों. त्याचें कारण कदाचित् असें असावें की, आपल्या नेहमीच्या मित्रांकडून रहस्यस्फोट होण्याची जी भीति आपल्याला असते, तिचा असल्या प्रवासांतील मैत्रींत अभाव असतो. त्या मैत्रींतील एक संकेतच मुळी हा असतो की, एकमेकांचा निरोप घेतांना त्या दोस्तीच्या काळांत बोललेल्या आणि केलेल्या साऱ्या गोष्टी विसरून जावयाच्या. जणु कांही आपण कधीं एकमेकांना भेटलोंच नव्हतों! त्यामुळे अशा प्रकारच्या प्रवासी मैत्रींत आत्मकथन आणि आत्मगोपन यांचा आनंद एकदमच लुटतां येतो.

माझीच गोष्ट घ्या ना! बारमधून माझ्या खोलींत आल्यावर त्या दिवशीं रात्रीं ज्या गोष्टी मी आपल्या त्या नव्या दोस्ताजवळ बोललों, त्या मी पूर्वीं कोणाशीं कधीं बोललों नव्हतों व पुढेहि कधीं बोलेन, असें वाटत नाही. त्याने आपल्या प्रवासी जीवनाचें जें रसभरित पुराण मला सांगितलें, तें ऐकून कॉलेजांत असतांना वाचलेलें दशकुमारचरितसुद्धा मला फिकें वाटलें. हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या भागांतील सराया, विश्रांतिगृहें, डाक-बंगले!—जणु कांही प्रच्छन्न वेश्यागृहेंच होतीं तीं सारीं! मदनाच्या मुलखांतील त्याच्या त्या एक एक नवलपरीच्या मुशाफरीची हकीकत ऐकून माझा धीर चेपला; व माझी कॉलेजच्या दिवसांतील एकुलती एक मुशाफरी त्याच्या आग्रहावरून मी त्याला लाजत लाजत सांगितली. तसा कांही विशेष दम नव्हता त्या मुशाफरींत. कॉलेजांत असतांना आमच्या वर्गांतल्या विजया कोठारेवर आपलें प्रेम जडलें असल्याचा मला भास झाला; व आमचे दोघांचे वडील एकाच फर्मचे भागीदार असल्यामुळे त्या प्रेमाला व्यक्त व्हावयाला संधीहि मिळाली. पुढे एक दिवस मी तिला अतिशय आवडणारा सुरंगीचा गजरा

घेऊन तिच्या घरीं गेलों. तो गजरा मी तिच्या वेणीवर घालीत असतां तिच्या धाकट्या बहिणीने हा प्रकार पाहिला आणि तिथेच आमच्या प्रणयचेष्टांची परिसमाप्ति झाली. माझ्या आयुष्यांतला हा एकुलता एक प्रेमप्रसंग मी अद्याप कोणालाही सांगितला नव्हता. त्यामुळे तो सांगतांना माझ्या अंगावर रोमांच इतके थरारून उठत होते की, त्यापुढे मांजराचें पिंजारलेलें शेपूट कांहीच नव्हे !

आमच्या या गप्पांचा शेवट नृत्यगृहांत जाण्यांत व्हावा, हें अगदी स्वाभाविक होतें. रात्रीं अकराच्या सुमाराला आम्ही तिथे गेलों. त्या वेळीं पांच जोडपीं दिवाणखान्यांत नाचत होतीं व बाकीचे लोक निरनिराळया पेयांचा आस्वाद घेत गप्पा मारीत होते. त्या दिवाणखान्यांत जमलेल्या तरुणी म्हणजे आमच्या काफेंतील मद्यांगनेच्या अधिक रंगीत आणि रंगेल आवृत्त्या होत्या; व नृत्याच्या वेळीं होणारे त्यांचे हावभाव पाहून वाटे की, हें नृत्य म्हणजे काम-क्रीडेची केवळ प्रस्तावना आहे ! माझ्या दोस्ताने तिथे गेल्यानंतर थोड्याच वेळांत एका तरुणीच्या कृश कटिबंधाला हाताने विळखा घालून नृत्याला सुर-वात केली. तेथील तीनचार तरुणींशीं माझी ओळख करून देऊन, त्यांच्या-बरोबर नृत्य करण्याचा त्याने मलाहि फार आग्रह केला. पण माझी त्य कलेंत मुळींच गति नसल्यामुळे मी त्याचा आग्रह आणि त्या तरुणींचा अनु-नय यांना आभारपूर्वक नकार दिला; व तो नाचत असतांना निरनिराळ्या तरुणींबरोबर मद्याचा आस्वाद घेण्यांत रात्र घालविली. पहाटे आम्ही ज्या वेळीं घरीं यावयाला परतलों, त्या वेळीं माझें डोकें इतकें गरगरत होतें की, घरीं आल्यावर बर्फाचें थंड पाणी त्यावर घालूनहि भोंवळ थांबेना !

माझ्या दोस्तावर मात्र या निशाचरणाचा कांहीच परिणाम झाला नाही. सकाळीं नऊच्या सुमारास तो माझ्या खोलींत आला व आपल्याबरोबर मला बारमध्ये येण्याचा आग्रह करूं लागला. मला तर त्याहि वेळीं नीट उभें राहतां येत नव्हतें. पण त्याच्या आग्रहास्तव डोक्यावर पाणी घालून व चेहऱ्याची डागडुजी करून मी बारमध्ये आलों.

त्याने सिगारेट शिलगावून केस माझ्यापुढे केली; व तिचा सुवासिक

गरम धूर घशांत वाफारत असतांनाच बारमेडने मद्याचे पेले आमच्यापुढे ठेवले. त्या वेळीं तिच्याकडे पाहून त्याने अशा कांही मजेदार रीतीने डोळे मोडले की, मला त्या सुस्त अवस्थेंतहि हसूं आल्याविना राहिलें नाही. आणि मी त्याला म्हटलें, " तरुण पोरींना खेळविण्याची कला तुम्हांला फार छान साधली आहे !—"

" त्या कलेशिवाय निभाव नाही लागायचा माझ्यासारख्या प्रवासी, फटिंग माणसाचा ! इंग्रजींत म्हण आहे,–'खलाशाची बायको प्रत्येक बंदरांत असते.' ती म्हण प्रवासी प्रतिनिधींनाही थोड्याबहुत प्रमाणांत लावतां येईल. शिवाय, ही एक चटक, हें एक व्यसन आहे. एकदा मनुष्याला या जीवनाची चटक लागली, म्हणजे स्थिर कौटुंबिक आयुष्यापेक्षा प्रत्येक दिवशीं नव्या अनुभूतीचा आस्वाद घेण्याची संधि देणारं हें भटकं, बेछूट जीवन त्याला जास्त आवडतं ! "

" पण इतक्या बायकांशीं तुमचा संबंध येतो न् एकीच्याहि प्रेमपाशांत तुम्ही सापडत नाही, हें कसं ? "

" याचं उत्तर अगदी सोपं आहे. असल्या संबंधांत प्रेम नसतं न् पाशहि नसतो ! आमची शारीरिक न् त्यांची आर्थिक गरज भागविण्यापुरते आम्ही एकत्र येतों; व त्या गरजेच्या तृप्ततेबरोबर एकमेकांना विसरूनहि जातों. या अनुभवांत जर कांही मजा असेल, तर ती हीच आहे की, क्षणिक भावनेच्या आवेगांत एकत्र यायचं न् त्याची धुंदी डोळयांवरून उतरतांच कवटाळलेल्या व्यक्तीला विसरून जायचं !— "

बोलतां बोलतां त्याच्या चेहऱ्यावर प्रथमच विषादाची छटा झर्रकन् उमटून गेली.

" पण आतापर्यंतच्या तुमच्या मुशाफरींत एकाहि स्त्रीविषयी तुम्हांला प्रेम वाटलं नाही ? "

" नाही कसं ? केव्हा केव्हा फार ओढ लागते मनाला,– पण त्याबरोबरच ही जाणीव असते की, ही ओढ प्रबळ होऊं देणं इष्ट नाही आणि पुढच्या मुक्कामांतल्या नव्या आकर्षणांत त्या भावनेची स्मृति बुडवून टाकतों

मी ! – तुम्हांला नाही यायची या आयुष्याची कल्पना कधी. ही एक प्रकारची शिकार आहे— ”

“ इतकी सुलभ असते ही शिकार ? ”

“ हो हो. ज्याच्याजवळ रूप आहे, पैसा आहे अन् चातुर्य आहे, त्याला तरी स्त्री ही चीज दुर्लभ नाही— ”

त्याचे हे शब्द सारखे माझ्या मनांत घोळत होते. त्या दिवशीं रात्रींहि त्याच कार्यक्रमाची पुनरावृत्ति झाली; व सकाळीं उठावयाला उशीर झाल्यामुळे घाईघाईने आम्ही स्टेशनवर आलों होतों.

गेल्या दोन रात्रीं जागरणांत घालविल्यामुळे मला विलक्षण थकवा आला होता. स्टेशनवर आल्यावर आम्ही एकवार मद्य घेतलें व गाडीची वाट पहात फलाटावर येरझारा घालूं लागलों.

फिरत फिरत आम्ही फलाटाला लागून असलेल्या बागेसमोर आलों.

तोंच तो थबकला.

त्याबरोबर मीं मागे वळून म्हटलें, “ कां, काय विचार आहे आता आणखी ? ”

“ तिकडे पहा ! ” त्याने माझ्याकडे न बघतांच म्हटलें.

मला वाटलें, समोरच्या डोंगरावरील दृश्य मला तो पहावयाला सांगत आहे; व म्हणून मी उद्गारलों, “ वा ! सुंदर ! धुकं न् सूर्यप्रकाश यांचा काय बहारीचा खेळ चालला आहे त्या डोंगराभोवती !—”

“ छे छे ! तें नाही पहायला सांगितलं मी तुम्हांला ! ती पहा !–त्या बागेच्या कठड्याला टेकून उभी आहे—”

मी लगेच चमकून त्या बाजूला पाहिलें. हातांत झाडणी घेतलेली एक तरुण स्त्री त्या कुंपणावर ओठंगून आमच्याकडे पहात होती.

तिच्या अवयवांतून तारुण्य मुसमुसत होतें, डोळ्यांतून उत्कंठा ओसंडत होती.

त्याने तिच्याकडे पाहून स्मित केलें—

—तिने किंचित् मुरडून पदर सरसा केला.

फलाटावर माणसें फारशीं नव्हतीं. पण मला तो प्रकार अप्रशस्त वाटला; व मी त्याला म्हटलें, " चला, आणखी एक चक्कर मारूं या. चार मिनिटं आहेत आता गाडी यायला— "

आम्ही परत फिरलों. पण त्याचे पाय पूर्वीच्या उत्साहाने पडत नव्हते. त्याच्या शरिराला उलट दिशेने ओढ लागली होती.

आम्ही चक्कर संपवून परत फिरलों.—ती तरुण स्त्री तिथेच उभी होती; व तितक्याच आतुरतेने आमच्याकडे,—त्याच्याकडे पहात होती.

तो तिच्याकडे पाहून हसला·—तिनेहि त्याच्याकडे पाहून स्मित केलें.

मी त्याला कांही म्हणणार, तोंच एक्स्प्रेस स्टेशनमध्ये शिरली.

हमालाने आमचें सामान आंत चढवलें.

आम्ही डब्यांत जाऊन सामानाची व्यवस्था पाहून आलों. तोंच माझा दोस्त मला म्हणाला, " आणखी एक चक्कर मारूं या ! अजून वेळ आहे गाडी सुटायला—"

मला खाली उतरण्याची इच्छा नव्हती. पण त्याचे ते काल सकाळचे शब्द माझ्या कानांत सारखे घुमत होते. एक प्रकारच्या जिज्ञासेने त्याच्या मागोमाग मी खाली उतरलों.

आम्ही त्या बाकेजवळ आलों—ती स्त्री अद्याप तिथेच उभी होती.

तिने त्याच्याकडे इतक्या विवशतेने पाहिलें—

—तिचे प्राण जणु डोळ्यांत एकवटले होते.

तो एकदम माझ्याकडे वळून उद्गारला, " गुड् बाय् ! आज इथंच मुक्काम करणार मी !—"

आणि त्याने हमालाला डब्यांतून आपलें सामान बाहेर काढावयाला सांगितलें.

— डिसेंबर, १९३६

## ८ : : : : दिलरुबा

दादा ज्या दिवशीं आले, त्या दिवसाची मला चांगली आठवण आहे.

सूर्य नुकताच कलला होता. मी निजून उठलों होतों, तरी मन निद्रे-च्या तंद्रेंतून बाहेर पडलें नव्हतें; व अर्धवट पडलेलें स्वप्न मी पुन्हा उघड्या डोळ्यांनी पहात होतों. इतक्यांत ताई जवळ येऊन म्हणाली, " भाऊ, दादा आले ! "

त्याबरोबर मी दचकून उभा राहिलों; व तिच्याकडे न बघतां घाई-घाईने वाड्याच्या पायऱ्या उतरून टांग्याजवळ गेलों. दादा टांग्यांतच होते. त्यांच्याबरोबरचा मनुष्य सामान काढीत होता. त्याने वळकटी, पुस्तकें, पाण्याचा तांब्या उचलला. दादांच्या खांद्याला लागून उभा असलेला गवसणींत गुंडाळलेला दिलरुबा तेवढा टांग्यांत राहिला होता. तो मी उचलणार, तोंच दादा म्हणाले, " राहूं दे, मीच घेईन तो !"

मी त्यांना हात दिला; व ते टांग्यांतून खालीं उतरले. त्यांनी एका हातांत दिलरुबा घेतला; व दुसऱ्या हातांतील काठीने वाट चाचपीत ते हळूहळू घरांत आले.

त्याच दिवशीं मी त्यांना प्रथम पाहिलें. ते आमच्या बाबांचे परम

स्नेही. त्यांच्या बहुश्रुतपणाची ख्याति मी बाबांच्या तोंडून पुष्कळ ऐकली होती. बाबा वेदान्ताचे फार भोक्ते होते. दादांच्या गीतेवरील व्यासंगाची ते अतिशय वाखाणणी करीत; व नेहमी म्हणत की, "देवाने दृष्टि हिरावून नेली, तरी दादांची श्रद्धा अणुमात्रसुद्धा ढळली नाही. आणि तूं पहा, नुसतीं मिलचीं पुस्तकें वाचून झालास कीं नाही संशयात्मा!" पण दादांना प्रत्यक्ष पाहण्याचा योग मात्र आजवर आला नव्हता. ते बहुधा श्रावणाच्या सुमारास आमच्या घरीं यावयाचे. त्या वेळीं मी पुण्यास असे. यंदा दसरा झाल्यावर येण्याची त्यांची लहर लागली. कॉलेज बंद असल्यामुळे मी घरींच होतों; व म्हणून त्यांना पाहण्याचा योग आला.

त्यांना पाहतांच मी क्षणभर स्तब्ध झालों. आपण आंधळे आहोंत, याचें भान त्यांना मुळीं नव्हतेंच. मी नांव सांगतांच ते हसले व म्हणाले, "अखेर आज भेटीचा योग आला तर! देवाची कृपा!"

त्यांच्या शांत मुद्रेवरील संतोषाचें स्मित पाहून मला बरें वाटलें. त्यांची ती भव्य शरीरयष्टि, काळासावळा पण सतेज वर्ण, चिंतेचे कंगोरे पडलेलें उंच कपाळ व डोक्याला बांधलेला शुभ्र फेटा बघून माझें मन किंचित् हरखलें. त्यांच्या तोंडावर देवीचे वण खोल आणि दाट पसरलेले होते; व दोन्हीहि डोळयांच्या अगदी खाचा झाल्या होत्या. आटून कोरडें पडलेलें सुंदर सरोवर जसें दिसावें, तसे त्यांचे ते विशाल डोळे दिसत होते. त्या डोळयांकडे नजर जातांच मी अगदी थिजून गेलों; माझा सगळा आनंद नष्ट झाला व मला त्यांची दया आली.

पण त्यांचे सर्व व्यवहार संथपणाने चालले होते. जणु कांही त्यांच्यांत आणि इतरांत फरक कसा तो नव्हताच! सूर्य अस्ताला गेल्याचें समजतांच त्यांनी विहिरीवर जाऊन पाय धुतले आणि संध्या केली; व नंतर स्तोत्रें गुण-गुणत शिष्याच्या मदतीने ते माडीवर गेले.

जेवणाची वेळ होतांच बाबा मला म्हणाले, "दादांना खाली बोलाव रे!"

मी अंगणांत गेलों व माडीकडे नजर फेकली. तिथे पूर्ण अंधार होता.

मला वाटलें, दादा तिथे नसावेत, खाली बागेंत असतील. म्हणून मी तिकडे गेलों; पण बागेंतहि ते नव्हते.

इतक्यांत माझी चाहूल ऐकून बाबा म्हणाले," अरे, माडीवर आहेत ते, लवकर हाक मार !" मी मुकाट्याने अंगणांत जाऊन हाक मारली. ते खरो-खरीच वर होते. त्यांना गॅलरींत आलेले पाहतांच मी मनांत म्हटलें," खरंच, यांना दिव्याची काय जरूर ? "

आणि मला त्यांच्या आंधळेपणाची एकदम तीव्रतेने जाणीव झाली.

× × ×

त्या रात्रीं मला झोप येईना. माझें मन आधीच अति तल्लख. अंथरुणा-वर पडतांक्षणींच झोप आली, असें सहसा घडत नसे. नाही नाही ते विचार व नाना तऱ्हेच्या आठवणी अंथरुणावर पडल्याबरोबर माझ्या मनाला घेरून टाकीत. दिवसा कामांत असल्यामुळे अगर मनाला रिकामपण नसल्यामुळे जे विचार, ज्या कल्पना कधी सुचावयाच्या नाहीत, त्यांची बिछान्यावर अंग टाकतांच अगदी गर्दी उडे; व भ्रमिष्टासारखी माझ्या मनाची अवस्था होई. भोवऱ्यांत सापडलेल्या मनुष्याला जसें गिरक्या खातां खातां थकून मरण यावें, तसें माझें मन विचार करून करून अगदी टेकीला आलें म्हणजे मग डोळा लागे. निजून उठल्यावर मी अगदीं गळून जात असे. डोळयांवर अर्धवट झापड घालून निद्रा ही मोहनीविद्येंत पटाईत असलेल्या चेटकिणीप्रमाणे माझ्या मनाला कल्पनेच्या आणि स्मृतीच्या प्रदेशांतून दूर दूर हिंडवून आणीत असे; व मग सकाळीं अंथरुणांतून उठण्याचेंहि माझ्या जिवावर येई.

त्यांतून त्या दिवशीं तर मी अगदी अकल्पित पाहिलेलें. आजपर्यंत रस्त्यांतून जातांना आंधळीं माणसें कांहीं थोडीं दृष्टीस पडलीं नव्हतीं. पण त्यांना पाहून मी इतका विचारांत कधीच पडलों नाही. आंधळेपण मूर्तिमंत समोर येऊन उभें राहिलेलें बघण्याचा प्रसंग त्याच दिवशीं पहिल्यांदा माझ्या-वर आला. दुःख पाहिलें म्हणजे त्याला चुकविण्याकरिता तोंड फिरविणें, हा माझा स्वभावच बनला होता. पण आज जगांतील मोठ्यांतलें मोठें दुःख माझ्या-पुढे साक्षात् येऊन उभें राहिलें. आणि आता त्याला चुकविणेंहि शक्य नव्हतें.

घरांतील सगळीं माणसें निजलीं होतीं. माझ्या खोलीला लागून असलेल्या दिवाणखान्यांतच दादा निजले होते. त्यांचा श्वासोच्छ्वास मधून मधून कानांवर पडे. बागेंतील फुलांचा सुवास वाऱ्याच्या झुळुकेबरोबर खिडकींतून आंत येत होता. त्या दिवशीं अष्टमी होती. खिडकींतून आंत आलेले चंद्रकिरण माझ्या अंगावर पडले होते. डोळ्यांवर पडलेले चंद्राचे किरण चुकवावे, म्हणून वारंवार मी कपाळावर हात ठेवीत होतों. त्या चंद्रकिरणांतून वर आकाशाकडे दृष्टि लावली, म्हणजे मला वाटे, " दादांना हा चंद्र उगवला काय आणि मावळला काय, सारखाच ! " त्या चंद्राकडे बघतां बघतां मला आमच्या राजारामाची आठवण झाली. तो असाच गॅलरींत उघड्यावर निजे. आपण निजलों असतां चंद्रकिरण आपल्या अंगावर पडलेले असावेत, वाऱ्याच्या मंद झुळुका हळूच वहात असाव्यात, फुलांचा सुवास सभोवती दरवळत असावा आणि गाण्याचीहि मधुर लकेर कानांवर पडावी, याची त्याला फार आवड; व म्हणून थंडी किंवा पाऊस नसला की तो बेलाशक उघड्यावर निजावयाचा. बाबा नेहमी म्हणत, " अरे, हें वारें तुला बाधेल ना ? " पण त्याने तें कधीच मनावर घेऊं नये.' चांदण्यांत निजून मरण यावें,' असें तो म्हणे. आणि अखेर चांदणेंच त्याला भोवलें.

संस्कृत काव्यें वाचून वाचून तो अगदी वेडा झाला होता. कालिदासाच्या श्लोकांची संगति लावून त्यांतून नवे नवे अर्थ हुडकण्याची त्याला फार हौस. त्याचें तें वेड पाहून बाबा म्हणावयाचे, " या राजाला दादांच्या जवळ ठेवला पाहिजे. कालिदास त्यांना मुखोद्गत आहे. दादा मेघदूताचे असे सरस अर्थ लावतात की, ते ऐकून त्यांच्या कल्पनाशक्तीचें नवल वाटतें!" पण ज्याने सौंदर्य प्रत्यक्ष कधीहि पाहिलेलें नाही,त्याला कालिदास कसा कळावा, अशी शंका मला बाबांचे ते उद्गार ऐकून नेहमी येई. कलावंतांचा राजा, सौन्दर्याचा कलानिधि जो कालिदास त्याच्या उपमा वाचून, ज्याने सृष्टि कधी डोळे भरून पाहिलेली नाही, ज्याला सौंदर्याचा साक्षात्कार कधी घडलेला नाही, त्याला कसला आनंद होणार ? कालिदासाच्या सुंदर शब्दांशीं झोंबी खेळून, कोमल कल्पनांचा कीस काढून दादा कांही तरी अर्थ बसवीत असतील. पण सौंदर्याची

प्रतीति त्यांच्यासारख्या दृष्टिहीनाला कशी व्हावी? त्यांचें जीवित नीरस, निस्सार असलें पाहिजे. नाही तर गीतेंतील क्षराक्षराच्या शुष्क तर्कटांत ते कशाला रमते ? मला त्यांची कींव आली; व त्यांच्या दुर्दैवाचा विचार करतां करतांच माझा डोळा लागला.

× × ×

त्या रात्रीं मला स्वस्थ झोप तर मुळीच आली नाही. पहाटेचा गार वारा खिडकींतून आंत शिरतांच डोकें थंड होऊन जो कांही विसावा मनाला मिळाला असेल, तेवढाच. त्या झोपेच्या गुंगींत मी असतांना अत्यंत मधुर असे सूर माझ्या कानांत घुसले; व मी हळुहळू जागा झालों. ते सूर कोठून येत आहेत, हें मला प्रथम कळेना. खोलीचें दार अर्धवट लोटलेलें होतें; त्यांतून सूर आंत येतात कीं खिडकींतून येतात, कांही समजेना. उत्सुकता तर सारखी वाढत होती; पण उठून बघावें असेंहि वाटेना. अंथरुणावर पडल्या-पडल्याच डोळे मिटून पण सावध मनाने ते सूर मी ऐकत होतों. त्यांत अशी कांही जादू होती की, डोळ्यांवर गुंगी असतांहि मला झोप येईना. शेवटीं मी धडपडत उठलों; व बाहेर जाण्याकरिता दार उघडलें. तों समोरच दादा दिलरुबा वाजवीत बसलेले माझ्या दृष्टीस पडले. उषःकालच्या अंधुक उजेडांत त्यांची दिलरुबा मांडीवर घेऊन भूपाळ्या आळवीत बसलेली ती भव्य मूर्ति पाहतांच मला अचंबा वाटला.

मला खाली जाण्याचें भान उरलें नाही. मी भिंतीला टेकून तिथेच उभा राहिलों. दादा हातांतील गज दिलरुब्याच्या तारांवरून सफाईने फिरवीत होते; व त्यांतून अत्यंत सुरेल असें संगीत बाहेर पडत होतें. मधून मधून त्यांना स्वतःलाहि गाण्याची लहर येई. आणि जें पद ते दिलरुब्यावर वाजवीत, तेंच ओठ्या खालच्या आवाजांत ते गुणगुणत. त्यांचा आवाज गोड नव्हता. पण त्यांत एक प्रकारची झील होती. शिवाय ते तल्लीन होऊन म्हणत असल्यामुळे अंतःकरणांतील करुण रसाचा ओलावा त्यांत उतरे; व तें गुणगुणणेंहि मोठें गोड वाटे.

पुरतें उजाडतांच दादांनी गवसणी चढवून दिलरुबा आपल्या डोक्या-

वर असलेल्या खुंटीला लटकाविला. त्या क्षणापर्यंत आपल्या शेजारीं कुणी असेल, अशी कल्पनाहि त्यांना शिवली नव्हती. त्यांचें वाजविणें थांबतांच त्या नादसमाधींतून मी जागा झालों; व कांहीतरी बोलावयाचें म्हणून म्हटलें, " दादा, खाली चला; वेळ झाली." त्यावर ते म्हणाले, " काय रे, तूं इतका वेळ इथेच होतास तर ! बोलला नाहीस कुठे ? बराच नादी दिसतोस !" मी त्यांना उत्तर दिलें, " दादा, तुम्ही फार उत्तम वाजवतां. " त्यावर ते किंचित् हसून म्हणाले, " छे रे, उगीच जिवाला कांहीतरी करमणूक !"

इतकें बोलून ते उठले व जिना उतरणार तोंच आठवण केल्यासारखें करून उद्गारले, " काय रे, आज आभाळ आहे वाटतं ? ऊन पडलेलें दिसत नाही ?" मी त्यावर ' होय ' म्हणून लगेच उत्तर दिलें; पण ऊन न पडलेलें त्यांना कळल्याचें पाहून मला नवल वाटल्याशिवाय राहिलें नाही.

आम्ही खाली आलों. बाबा नित्याप्रमाणे बागेंत फिरत होते. मला पाहतांच पुढे येऊन ते म्हणाले, " भाऊ, हीं बघ गुलबाशीचीं फुलें. एकाच झाडावर फुललेलीं, पण प्रत्येकाचा रंग वेगवेगळा. " त्यांनी फुलझाडांवर रंगांचे प्रयोग चालविले होते. त्यामुळे ते कौतुकाने स्वतः फुलें पहात व इतरांनाहि दाखवीत होते. इतक्यांत दादा तोंड धुवून आले. तेव्हा त्यांना बेसावधपणाने बाबा म्हणाले, " हीं पहा फुलें, दादा ! झाडांनासुद्धा वर्णसंकर भोवतो. " मला जिरल्यासारखें झालें; पण दादांनी त्यावर अगदीं सहज " अहो ! हा वर्णसंकर फुलांचेंसुद्धा नैसर्गिक सौंदर्य नष्ट करतो! " असें उत्तर हसत हसत दिलें.

जणु कांही त्यांना तीं फुलें दिसतच होतीं.

× × ×

मी तो सबंध दिवस दादांच्या सहवासांत घालविला. त्यांनाहि बोलावयाला फार हवें असे. त्यांतून संस्कृत कवितेविषयी ते एकदा बोलूं लागले, म्हणजे त्याला इतके फाटे फुटत की, मूळ त्यांत बेपत्ता होऊन जाई. करुणरस त्यांना विशेष प्रिय. त्याच्याविषयी ते बोलूं लागले, म्हणजे चंद्रावरून झिरझिरीत ढग जसा झरकन् निघून जावा, तशी त्यांच्या समाधानी चर्चेवरून विषादाची

छटा उमटून जाते, असा मला पुष्कळ वेळा भास होई. त्यांचें सर्वच बोलणें मला पटे असें नव्हे, पण तें मोडून अगर खोडून काढण्याच्या फंदांत मात्र मी मुळीच पडलों नाहीं; कारण रात्रीं त्यांना बागेंत नेऊन, आपल्याला आवडणारीं कांही पदें त्यांच्याकडून वाजवून घ्यावयाचीं, असें मी ठरविलें होतें.

जेवण झाल्यावर मी त्यांना हळूच म्हटलें, "दादा, बागेंत चलतां का? आज चांदणें कसें सुंदर पडलें आहे." "चल, पण दिलरुबा आणला पाहिजे. तूं आणशील कां नीट?" असें त्यांनी विचारलें. मी लगेच जाऊन दिलरुबा आणला व आम्ही बागेंत गेलों. बाकावर बसल्याबरोबर दादांनी दिलरुबा गवसणींतून बाहेर काढला; व खुंट्या पिळून तारांवर हात फिरवावयाला सुरवात केली. चंद्र डोक्यावर आला होता. आकाश अगदी निरभ्र असल्यामुळे वाऱ्याच्या झुळकाहि मधून मधून येत होत्या. झाडांच्या पानांतून आमच्या अंगावर चांदण्याचे चिमुकले कवडसे पडले होते. रात्रीचें तें उज्ज्वल आणि गंभीर सौंदर्य पहावयाला दादांना डोळे नाहीत, हें मनांत येऊन मला वाईट वाटलें; व मी त्यांना तसें बोलून दाखविणार, तोंच ते मला म्हणाले, "अशा चांदण्यांत गाणेंबजावणें करण्यांत खरी मजा आहे. बोल भाऊ, तुला काय हवें तें पद मी आज वाजवून दाखवितों!"

हे त्यांचे उद्गार कानांवर पडतांच मी थक्क झालों व त्यांच्या चेहऱ्याकडे निरखून पाहिलें.

देवीच्या वणांनी डागळलेल्या व वार्धक्याने किंचित् सुरकुतलेल्या त्या उदास मुद्रेवर आनंदाचें सौम्य स्मित झळकत होतें. त्यांचीं बोटें दिलरुब्याच्या तारांवरून फिरत होतीं; त्यांनी खालचा ओठ किंचित् दाबून धरला होता व त्यांचे ते दोन्हीहि दृष्टिहीन डोळे सारखे थरथरत होते. त्यांना कसलें तरी निरतिशय सुख, अनिर्वचनीय आनंद झालेला दिसत होता. त्यांच्या डोळ्यांची ती धडपड पाहून मला मोठें नवल वाटलें. कोणताहि भाव व्यक्त करण्याची शक्ति त्या डोळ्यांत उरली नव्हती. तरीहि नुकत्याच मारलेल्या ससाच्या जोराने उडणाऱ्या काळजाप्रमाणे किंवा जिव्हारीं जखम झाल्यावरहि उडण्याच्या ईर्येने भुईवर पंख आपटणाऱ्या पक्ष्याप्रमाणे त्या डोळ्यांची उघडझाप सारखी

चालू होती. अत्यंत खोल अशा विहिरींतील प्रतिबिंब पाहून मन जसें भय-चकित व्हावें, तसेंच आनंदाने वारंवार स्फुरणारे त्यांचे ते भयाण डोळे पाहून मला झालें.

त्यांना कोणतें पद वाजवावयाला सांगावें, कांही समजेना. गाण्याचें ज्ञान तर मला मुळींच नव्हतें; पण गंधर्वाचीं पदें मला फार आवडत व म्हणून " गंधर्वाचें एखादें पद वाजवितां का ? " असें मी त्यांना हळूच विचारलें; पण पुन्हा लगेच माझ्या मनांत विचार आला, यांनी कशाला गंधर्वाचीं पदें ऐकलीं असतील ?

या भ्रमांत मी होतों, तोंच दादा हसत हसत म्हणाले, " अरे ! एखादी चीज, एखादा राग वाजवायला सांगायचा सोडून तूं हें गंधर्वाचें नाटकी गाणें कुठून काढलेंस ? तुम्हां अलीकडच्या विद्यार्थ्यांना गंधर्वाशिवाय कुणी दुसरा गवई दिसतच नाही का रे ? " हे त्यांच उद्गार ऐकून मी थोडा वरमून म्हणालों, " दादा, तसें नव्हे. मी आपलें सहज म्हटलें. तुम्हांला कुठून गंधर्वाचें पद ऐकण्याचा प्रसंग येणार ? तुम्ही वाजवा तुम्हांला वाटेल तें. "

त्यांवर लगेच ते उद्गारले, " मीहि गंधर्वाचीं पुष्कळ नाटकें पाहिलीं आहेत. तूं असं समजूं नकोस की, त्यांचीं पदें मला वाजवितां येणार नाहीत. मग पहाच तर आता. हं, कोणतें वाजवूं ? "

हें उत्तर ऐकून मी अगदी खजील झालों. त्यांचा आंधळेपणा कशांत आहे, हेंच मला समजेना; पण मुकाट्याने मन आवरून मी त्यांना " मधु-मधुरा तव गिरा, " हें पद वाजवायला सांगितलें. मला तें पद अतिशय आवडे व तें वाजवावयाला सांगतांच दादाहि म्हणाले, " फार छान पद निवडलेंस बुवा ! "

लगेच त्यांनी तारांवरून गज फिरवावयाला सुरवात केली. आता चंद्र किंचित् कळला होता. त्याचे किरण दिलरुब्याच्या तारांवर पडून त्या चमकत होत्या. दादांच्या हातांतील गज त्यांवरून फिरतांच, वल्हें मारतांच सळसळून उठणाऱ्या पाण्याच्या लाटांवर चांदणें जसें चमकावें, तसा भास होई. सरोवरा-च्या संथ पाण्यावरून ज्याप्रमाणे वाऱ्याच्या मंद झुळुका वहाव्या आणि अगदी

मृदु तरंग त्यावर जलदीने उठावे, त्याप्रमाणे त्यांच्या हातांतील गज त्या-वरून चपळाईने फिरे आणि नादाचे तरंग उचंबळून येत. तारांच्या कंपांबरोबर त्यांचे ओठ कापत व डोळेही सारखे थरथरत. जणु कांही बोलून दाखवितां येणें अशक्य असे आपल्या अंतःकरणांतील गूढ भाव त्या तारांच्या कंपनांतून ते प्रकट करीत होते. सौंदर्याची प्रतीति जशी त्यांना दृष्टीशिवाय घडे, तसे मनांतील भावहि ते शब्दांवाचून व्यक्त करतात, असें मला वाटलें.

तें पद संपतांच त्यांनी ' उगिच कां कांता ' हें पद वाजविलें आणि मग हिंदुस्थानी चिजा वाजवावयाला आरंभ केला. त्या चिजा मला मुळीच समजत नसत; पण त्यांचे सूर मोठे मोहक वाटत. त्यांतून दादांचें वाजविणें इतकें लपेटदार, सुरेल व सूक्ष्म होतें की, अर्थ न कळतांहि माझें मन व्याकुळ होई. कोणत्या फुलाचा वास आहे, हें माहीत नसलें तरी मन सुवासाला भुलतें, तसेंच गाण्याच्या लकेरींचेंही आहे. पण नुसत्या नादाला—मानवी कंठांतून निघणाऱ्या आलापांना नव्हे—तारांच्या कंपनांमुळे उद्भूत होणाऱ्या स्वरलहरींना भुलणें हा अनुभव मला आजवर आला नव्हता. अर्थ न कळतांहि हरिण कसा नादाला लोभावतो, हें मला त्या दिवशीं समजलें.

दादांची या वेळीं अगदी समाधि लागली होती. ते कोणता राग वाजवीत होते कोण जाणे ! पण त्यांनी आपला ओठ घट्ट दाबून धरला होता; त्यांचा श्वास जोराने येत होता व डोळे अतिशय थरथरत होते. ते भरून आले आहेत, असाहि भास मला झाला. मला वाटलें, त्यांना एकसारखें वाजविल्या-मुळे त्रास होत असेल; पण त्यांची ती अवस्था पाहून बोलण्याचाहि धीर होईना. इतक्यांत त्यांचा हात एकदम थांबला व ते कापऱ्या आवाजाने म्हणाले—

" भाऊ, काय सांगूं तुला ? हा दिलरुबाच आता या संसारांत मला दिलासा देऊन राहिला आहे. नाही तर माझ्यासारख्या फटिंगाने दुसऱ्या कशावर आता जीव धरून दिवस काढावे ? तूं म्हणत असशील, या आंधळ्याने ही कला कुठून पैदा केली ? गुडघ्याएवढा असेन नसेन, तेव्हा देवी येऊन डोळ्यांच्या खाचा झाल्या. सूर्य मावळला म्हणजे दिवस बुडाला, असें

## १ : : : दोष कोणाचा ?

### विहार—

माझा खासच नव्हे.

आम्हां तिघांच्या भोवतालचं जग आज माझ्याकडे डोळे वटारून पहात आहे. विश्रामच्या त्या शांत डोळ्यांतसुद्धा मला अलिकडे केव्हा केव्हा उद्वेगाची, विषादाची छटा उमटल्यासारखी दिसते. कदाचित् तो भासहि असेल. त्याच्या डोळ्यांभोवती पडलेलीं काळीं खळीं— त्यांच्या दाट छायेमुळंही तसा भास होत असेल मला. तलावाच्या भोवती जर गर्द झाडी असली, तर त्या झाडीच्या सावल्यांमुळं नाही का त्याचं पाणी काळवंडून भयाण दिसत ? तापानं अहर्निश होरपळत असलेला विश्राम— त्याच्या त्या म्लान डोळ्यांत एखादे वेळीं जर विषादाची झाक दिसली, तर मी त्याबद्दल लगेच गैरसमज करून घ्यावा, त्याच्या उदारतेविषयी साशंक व्हावं, हें योग्य ठरेल का ?

पण मी तरी काय करूं ? विश्रामवर रागवावं, त्याच्याविषयीं विपरीत विचार मनांत यावे, असं मला कसं वाटेल? लहानपणीं शाळेमध्ये त्याच्या त्या कृश, किंचित् गंभीर पण प्रसन्न मूर्तीकडे पाहून मला जें आकर्षण वाटलं, तें

आज या घटकेलासुद्धा कायम आहे. त्याचे ते काळेभोर केस न् टपोरे भाव-पूर्ण डोळे— ते अजून लुकलुकतांना दिसतात, म्हणूनच वाटतं की, अंथरुणावर कोणीतरी निजलेलं आहे— इतका तो खंगला आहे आता. शाळेंत असतांना टांग्याचं चाक लागून त्याच्या पायाचं हाड दुखावलं होतं. त्या दुखण्यांत मी तास न् तास त्याचे हात आपल्या हातांत घेऊन गप्पा मारीत बसत असे; पण अलिकडे मला बघितल्याबरोबर उद्विग्न होणारे विश्रामचे डोळे ! छे, मला आता बसवत नाही त्याच्या शेजारीं—

लहानपणीं तो मला केव्हा केव्हा म्हणायचा, "माणसाचं शरीर म्हणजे एक पिंजरा आहे केवळ. त्याच्या मनांत येणाऱ्या उच्च कल्पनांचा व त्याच्या शरिराचा संबंध नाही कांहीसुद्धा. उलट तें शरीर त्या उच्च कल्पना अंमलांत आणायला अडथळा करतं त्याला. पाण्यानं भरलेला ढग कितीहि वेळ आकाशांत चमकत न् गडगडत राहिला, तरी अखेर त्याला जमिनीवर कोसळावं लागतं. ती भीति तेजोमेघाला नाही. माणसांचीं शरिरं जर तेजोमेघांप्रमाणं नुसतीं तेजोमय असतीं, तर किती छान झालं असतं, विहार ! त्याच्या मनांत उद्भूत होणाऱ्या उदात्त कल्पनांइतकंच त्याचं जीवनहि उदात्त राहिलं असतं;— पण शरिरामुळं, त्याच्या निरनिराळ्या गरजांमुळं उदात्तता आणि मानवता यांची फारकत झाली आहे; मनुष्याचं आत्मिक जीवन आणि शारीरिक जीवन यांत जमीनअस्मानाचा फरक पडला आहे— "

त्याला मी इतका कां आवडत असे, हें कोडं आहे मला खरोखरी एक. त्याची वृत्ति सर्वच बाबतींत अपार्थिव. स्वतःच्या कल्पनेनं स्वतःभोंवती उदात्त वातावरण उत्पन्न करून त्यांत तो रमलेला असायचा. मला आठवतं, कॉलेजांत असतांना जेव्हा तो हिवतापानं आजारी पडून फार अशक्त झाला, तेव्हा डॉक्टरांनी अंडीं घ्यायला सांगितलीं त्याला; पण तींसुद्धा घ्यायचीं नाकारलीं त्यानं. – त्याच्या अगदी उलट मी. कमळनाथाच्या संगतीनं मला मत्स्या-हाराची इतकी चटक लागली की, मग शाकाहारी जेवण चालेनासं झालं मला. तो कॉलेजांत अभ्यास न् वक्तृत्व यांच्याबद्दल प्रसिद्ध होता; मी खेळ न् गुंडगिरी यांच्याबद्दल गाजलों होतों. माझ्या या मस्त वृत्तीबद्दल तो केव्हा केव्हा नाराजी

दर्शवायचा. तेव्हा मी त्याला म्हणत असे, " विश्राम, शरिराला न् शारीरिक गरजांना तूं कितीहि नाकं मुरडलींस, तरी शरिरामुळंच आपल्याला उपभोग घेतां येतो सगळया सुखांचा न् आपल्या जीवनांत वैचित्र्य उत्पन्न झालंय्, हें विसरूं नकोस तूं ! "

आम्हां दोघांना एकत्र पाहून कमळनाथ म्हणायचा, " तुम्ही एकमेकां-पेक्षा अगदी निराळे आहांत म्हणूनच तुम्हांला इतकं आकर्षण वाटतं एकमेकां-विषयी ! " खरं होतं त्याचं तें म्हणणं एका परीनं. विश्रामच्या सान्निध्यांत मला एक प्रकारची रम्यता, एक प्रकारची शांति वाटत असे. त्याच्याशीं बराच वेळ बोललं, म्हणजे एक प्रकारच्या उदात्त वातावरणांत आपण विहार करून आलों, असें वाटे. पुष्कळदा त्याच्या कल्पना अगदी चमत्कारिक वाटत मला. वेल्सच्या कल्पनासृष्टीवरून बोलतांना तो एकदा मला म्हणाला होता," कायद्या-च्या भीतीवाचून समाज चालणं, हें जसं राजनीतीचं अत्युच्च ध्येय, तसंच लग्नाच्या बंधनाशिवाय संसार चालणं, हें समाजनीतीचं अत्युच्च ध्येय असलं पाहिजे. स्त्री ज्या दिवशीं आर्थिक दृष्टया पूर्णपणें स्वतंत्र होईल, त्या दिवशीं कुटुंबपद्धति टिकली तर ती मातृसत्ताक होऊनच टिकेल; न् मग पुरुषाला मालकीची भावना आणि मत्सर हे दोन्हीहि विकार सोडून द्यावे लागतील. स्त्रीच्या परतंत्रतेमुळं तिचं एकटीचंच पतन झालं आहे असं नव्हे; पुरुषाचंहि पतन झालं आहे, त्याची माणुसकी खुरटून गेली आहे. स्त्री स्वतंत्र झाल्यानं पुरुष पूर्ण होईल— "

—या असल्या चर्चेतूनच ती कल्पना निघाली. मृणालला आम्ही दोघांनी एकदमच पाहिली न् दोघांच्याहि मनांत तिच्याविषयी उत्कट प्रेम उत्पन्न झालं. मला चांगली आठवण आहे त्या प्रसंगाची. कमळनाथनं हॉकीचं शील्ड जिंकल्याबद्दल मेजवानी होती आम्हांला. त्या वेळीं मृणालला प्रथम बघितली आम्ही. जेवायला बसायच्या थोडं आधी तिची ओळख करून देतांना कमळ म्हणाला, " विश्राम, ही माझी आतेबहीण मृणाल. विल्सनमध्ये आहे ही. इंटर झाल्यावर मुद्दाम कोल्हापूरहून शिकायला आली आहे इथं. जेवल्यावर आपण गाणं ऐकूं हिचं. " तिनं तीन चारच भावगीतं म्हटलीं असतील, पण

विश्राम अगदी बदलल्यासारखा झाला त्या क्षणापासून. मला तिच्या त्या गायनापेक्षा तिचं रूपच जास्त लोभनीय वाटलं. खोलीवर येतांना मी वाटेंत त्याला विचारलं, " तुला कसं काय गाणं आवडलं मृणालचं, विश्राम ? "

" तिचं गाणं भिनून गेलंय् माझ्या अंतःकरणांत ! " तो आवेशाने उद्गारला. किती अर्थपूर्ण होते त्याचे ते शब्द !

त्याचं तिच्यावर प्रेम जडलंय्, हें तत्क्षणींच लक्ष्यांत आलं माझ्या; न् मी त्याच्या वाटेंतून दूर व्हायचं ठरवून टाकलं. मला फक्त एकच अंधुक आशा होती. —मृणालचं प्रेम जर उलट त्याच्यावर जडलेलं नसेल, तर मात्र तिला मिळविण्याचा प्रयत्न आपण करायला कांही हरकत नाही. माझ्या मनाशीं मी प्रेमाची एक व्याख्या केली होती—जीवनाला पूर्णता आणतं तें प्रेम. दोन मित्र जेव्हा एकमेकांवर प्रेम करतात, तेव्हा ते एकमेकांना पूरक होतात, आपआपल्या भिन्न गुणविशेषांनी परस्परांतल्या उणीवा भरून काढतात. स्त्रीपुरुषांतलं आकर्षण हेंसुद्धा याच प्रकारचं नाही का ?— त्यामुळं मला आशा होती की, माझ्याहून अगदी वेगळया वृत्तीच्या विश्रामचं प्रेम जसं मला लाभलं, तसंच मृणालचंहि प्रेम मला लाभेल; पण माझा हा कयास चुकला. तिचा ओढा त्याच्याकडे आहे, हे लवकरच ध्यानांत आलं माझ्या. दोन मित्रांच्या प्रेमाला त्यांच्या वृत्तींतला विरोध पोषक होत असेल कदाचित्. माझ्या न् विश्रामच्या स्नेहाला तरी तो विरोधच मुख्यतः कारण झाला होता. पण स्त्रीपुरुषांमधील आकर्षणाला त्यांच्यांतील शारीरिक भेद आधीच इतका कांही पोषक झालेला असतो की, मग त्यांच्यांत स्वभावसाम्य असल्यास तें त्या आकर्षणाला दृढताच आणतं उलट. विश्राम आणि मृणाल यांच्या वृत्तींत न् अभिरुचींत अतिशयच सादृश्य होतं. त्यामुळं त्यांचीं मनं लवकरच समरस झालीं; त्यांचं साहचर्य झपाट्यानं वाढत गेलं. मला विश्राम पूर्वीइतकाच प्रिय होता; पण त्या दोघांचा तो वाढता प्रणय पाहून माझ्या मनाला वेदना होत; न् त्या विश्रामच्या निदर्शनाला येऊं नयेत, म्हणून ती आमच्या खोलीवर येण्याच्या वेळीं मी कांहीतरी निमित्त काढून बाहेर रहात असे बहुतेक; पण त्यामुळंच संशय आला विश्रामला—

त्यानं मला एक दिवस सरळ सरळ विचारलं न् मीहि त्याला सरळ

सरळ सांगितलं. त्यावर त्यानं चटदिशीं मला विचारलं,"आपल्याला दोघांनाहि नाही का मृणालच्या प्रेमाचे वाटेकरी होतां येणार, विहार ?—"

" भलतंच कांही तरी ? अशक्य आहे तें विश्राम !—"

" अशक्य कांहीहि नाही त्यांत ! आपलं दोघांचं जर एकमेकांवर खरोखरीच प्रेम असेल, न् तिच्यावरहि जर आपलं तितकंच प्रेम असेल, तर कांहीहि अशक्य नाही त्यांत. प्रेमात वाटणी अशक्य होते, ती मत्सरामुळं. पण तुला न् मला एकमेकांविषयी कधी मत्सर वाटेल, ही कल्पनाहि सहन नाही होत माझ्या मनाला—"

" पण आपलं दोघांचं तिच्यावर प्रेम असलं, तरी तिचं प्रेम दोघांवर आहे का ?—"

" नाही असं समजायला तरी काय कारण आहे आपल्याला ? तूं जर ती येते त्या वेळीं मुळी घरींच नसतोस, तर तिच्या तुझ्याविषयी काय भावना आहेत हें कसं कळणार तुला ?—"

## मृणाल—

लोक मला नांवं ठेवतात; माझ्या वर्तनामुळं ते आजारी पडले असं म्हणतात. पण माझा काय दोष आहे यांत ?

विहारांचं माझ्यावर प्रेम आहे, याची विश्राम सांगेपर्यंत कल्पना नव्हती मला. मी त्यांच्याविषयी विचारहि केला नव्हता कधी. एक दिवस संध्याकाळीं आम्ही वरळीवर फिरायला गेलों असतां ' आश्रमहरिणी ' वरून बोलणं निघालं. तेव्हा विश्राम मध्येच एकदम म्हणाले, " मृणा, विहारचं तुझ्यावर प्रेम आहे हें लक्षांत आलंय् का तुझ्या ?—" मी चकित झालें त्यांचं तें विधान ऐकून. मी त्यांना भेटायला जाई, त्या वेळीं विहार सहसा घरीं नसत हें खरं. पण त्यांच्या त्या गैरहजेरीचं इंगित लक्षांत नाही आलं कधी माझ्या.— खरं सांगायचं म्हणजे विश्राम न् ते एकाच खोलींत राहतात याची सुद्धा जाणीव नसे मला विश्रामांशीं बोलतांना ! पण, त्या दिवशीं विश्रामांनी ती गोष्ट मला सांगितल्या-पासून त्यांना भेटायला केव्हाहि मी त्यांच्या खोलीवर गेलें, म्हणजे विहार

जरी पूर्वीप्रमाणंच गैरहजर असले, तरी त्यांच्या अस्तित्वाची जाणीव सारखी बोचत असे माझ्या मनाला—

त्या स्थितींतच आमचं लग्न झालं.

विहारांकडून सुंदर आहेर आला आम्हांला. पण ते लग्नाला हजर नव्हते आणि लग्नानंतर पहिले सहा महिने ते दृष्टीसहि पडले नाहीत माझ्या—

मी त्यांना विसरून गेलें अगदीं पूर्णपणें.

विश्रामहि कधी बोलत नसत त्यांच्याविषयी.

पण, मला वाटे, विश्राम केव्हा केव्हा उदास असतात. आपल्या जीवनांत कांही तरी उणेपणा आहे, अपुरेपणा आहे, अशी भावना त्यांच्या दृष्टींत न् वृत्तींत उमटून दिसे. जेवतांना केव्हा केव्हा ते मध्येच थांबायचे; वाचतांना पुस्तक मिटून ठेवून खेपा घालायचे; किंवा मी गाणं म्हणून दाखवीत असतां मध्येच त्यांचे डोळे भरून यायचे.— अशा वेळीं मी त्यांना विचारी, " कसला विचार करीत आहांत तुम्ही ? — "

" कसला नाही. मधून मधून उदास वाटतं; कांहीहि करूं नयेसं वाटतं एखाद वेळीं ! — "

केव्हा केव्हा मला भीति वाटे.—ते स्वप्नांत बडबडत किंवा दचकून उठत.— न् मग त्यांना कितीं तरी वेळ झोप येत नसे. डोक्यावर थंडगार पाणी घातलं किंवा पंखा सारखा चालू ठेवला, तरीसुद्धा झोप येत नसे.

आमचं वैवाहिक जीवन अत्यंत सुखमय होतं. माझ्या दृष्टीनं आमच्या जीवनांत कसलीहि उणीव नव्हती. पण त्यांच्या जीवनांत मात्र कांही तरी हरपल्यासारखं झालं होतं.—

एके दिवशीं संध्याकाळीं आम्ही फिरून घरीं परत आलों, तोंच तार आली. ते सही करीत असतांना मी ती फोडून वाचली—

" विहार अतिशय आजारी. ताबडतोब निघा. "

बनारसहून आली होती ती तार. मी ती वाचून दाखवितांच ते उद्गारले, " लगेच निघालं पाहिजे मला— "

" बनारसला केव्हा गेले विहार ? "

" आपल्या लग्नाच्या थोडे दिवस आधी. तो डेमॉन्स्ट्रेटर आहे तिथं-"

" मी येतें तुमच्याबरोबर— "

" नको. मी शक्य तर त्याला घेऊनच येईन इथं. तीन चार दिवसां· करिता दोघांनी कशाला जायचं, मृणा !— "

ते गेले आणि पांच दिवसांनी अँब्युलन्स कारमधून स्ट्रेचरवर निजलेले विहार आमच्या घरीं रहायला आले. पॅराटॉयफाईड झाला होता त्यांना. विश्राम स्वतः त्यांची शुश्रूषा करीत· तेवढयासाठी महिन्याची रजा काढली त्यांनी कॉलेजांतून. विहारांचे कपडे स्वतः बदलायचे, मुसंब्यांचा रस स्वतः काढायचा, थर्मामिटर सुद्धा स्वतः लावायचं--

मला वाटे, यांचा विश्वासच नाही माझ्यावर—

एक दिवस मी म्हटलं सुद्धा त्यांना तसं. तेव्हा ते हसून म्हणाले, "वेडी आहेस तूं ! तूं खात्रीनं माझ्यापेक्षा जास्त चांगलं करशील त्याचं. पण माझ्या मनाला संकोच वाटूं नये म्हणून करतों मी. शिवाय रजा घेऊन घरीं राहलं म्हणजे कंटाळा येतो नुसतं बसण्याचा—"

पण, त्या आजाराच्या कष्टमय दिवसांत ते एकदाहि कधी उदास दिसले नाहीत मला. तें चेंगट दुखणं आनंदानं काढलं त्यांनी; न् विहारांचा ताप उतरून त्यांना थोडं बरं वाटूं लागतांच गप्पांत मजेनं वेळ जायला लागला त्या दोघांचा.-मात्र मी हजर नसलें पाहिजे तिथे ! मी हजर असलें, म्हणजे विहार मुग्ध रहात; न् ते बोलत असले तरी त्यांत मोकळेपणा नसे तितका. माझ्या खोलींत किंवा स्वयंपाकघरांत त्यांचं हसणं खिदळणं ऐकूं आलं, म्हणजे, मला वाटे, आपली अडचण होते त्यांना उगाच !—

लवकरच विहार पूर्ण बरे झाले आणि बनारसला परत गेले.

आणि यांच्या जीवनांतला उल्हासहि निम्मा कमी झाला.

बनारसहून लांब लांब पत्रें येत न् रात्रीं दोन दोन वाजेपर्यंत जागून ते त्या पत्रांना उत्तरें घालीत.

माझा त्या पत्रव्यवहाराशींहि कांही संबंध नव्हता.

एक दिवस रात्रीं मी फिलिस् बॉटम्ची 'प्रायव्हेट वर्ल्डस्' ही कांदबरी वाचीत असतां ते अचानक माझ्या खांद्यावर हात ठेवून म्हणाले, " मृणा, मी विहारला रहायला बोलावलंय् इथं—"

मी फक्त डोळे विस्फारून त्यांच्याकडे पाहिलें.

" त्याला बनारसची हवा मानवत नाही म्हणून मुद्दाम बोलावलंय् मी !"

ते बोलतां बोलतां थांबले न् पुन्हा कांही वेळानं उद्गारले, " तूं माझ्या-इतकीच काळजी घेतली पाहिजेस त्याची— "

मी कांही बोललें नाही. पण माझं मन अवस्थ झालं ती बातमी ऐकून.

त्यांतच एक दिवस रात्रीं आम्ही हार्डीच्या ' जूड ' मधील ' सू ब्राईड-हेड ' वरून बोलत असतां ते मला म्हणाले, " एका स्त्रीला दोन पुरुषांवर प्रेम करणं अशक्य आहे का मृणा ?—"

" हो. मला तरी असं वाटतं—"

" कां बरं ? एक पुरुष नाही एकाच वेळीं दोन स्त्रियांवर प्रेम करीत ? —"

" पण मैत्री आणि प्रेम या दोन गोष्टी भिन्न नाहीत का विश्राम ? मैत्रींत शरिराचा संबंध येत नाही. स्त्रीपुरुषांच्या प्रेमांत शारीरिक वासनांचा प्रभाव हा अत्यंत महत्त्वाचा घटक आहे— "

" पण, समज, त्या वासना दाबून टाकायच्या असं ठरवलं, तर एका स्त्रीला दोन पुरुषांवर प्रेम करणं शक्य होईल कीं नाही ? "

" वासना दाबून टाकणं कसं शक्य आहे ? त्या वासनांचा प्रभाव गृहीत धरूनच विचार केला पाहिजे या प्रश्नाचा— "

" पण, समज, दोघांहि पुरुषांचं एकाच स्त्रीवर प्रेम आहे, ते दोघे एकमेकांचे निस्सीम मित्र आहेत, तर त्या दोघां पुरुषांना आपल्याला प्रिय असलेल्या एका स्त्रीशीं संसार करायला काय हरकत आहे ?— "

त्यांच्या त्या प्रश्नानं लख्ख प्रकाश पडला माझ्या डोक्यांत; न् माझ्या अंगावर शहारे आले एकदम—

## विश्राम—

......होय. दोष माझाच आहे मृणा; तुझा नाही न् विहारचाहि नाही.

मी मृत्युशय्येवरून हें पत्र लिहीत आहें. आपल्याजवळ जें कांही होतें नव्हतें तें सारें माझ्या आजारापायीं खर्च झालें. तेव्हा मृत्युपत्र करून ठेवण्यासारखें आता कांही मजजवळ उरलेलेंच नाही. जर कांही उरलें असेल, तर आपल्या जीवनांतील जननिंदेचा विषय होऊन बसलेलें हें रहस्य. त्या जननिंदेची जीभ इतकी लांब आहे की, काल्यांसारख्या निवांत आणि एकांत स्थळीं येऊन पडल्यावरसुद्धा माझ्या काळजाला डसण्याचें तिने सोडलें नाही. एवढ्या लांबच्या अंतरावर आणि मी दिवस मोजीत आहें हें माहीत असतांनासुद्धा मला निनांवी पत्रें येतच असतात.

माझ्या मृत्यूनंतर तुझ्या मनाला खंत वाटत राहूं नये, म्हणून मुद्दाम मी हें पत्र लिहीत आहें. माझा हट्ट पुरविण्याकरिता तूं स्वतःच्या इच्छेविरुद्ध विहारच्या प्रेमाचा स्वीकार केलास. तें कृत्य करतांना तुझ्या मनाला किती यातना झाल्या, याची मला जाणीव आहे. तुझें मन वळवावयाला सहा महिने लागले मला. तरी सुद्धा माझीं मतें तुला पटलीं नाहीत. एका स्त्रीने दोघां मित्रांबरोबर संसार करावा, ही कल्पना तुला अमंगळ वाटली; आपला पति भलत्याच कल्पनेच्या आहारीं जाऊन आपल्याला व्यभिचाराला प्रवृत्त करींत आहे, असेंच तुझ्या मनाने घेतलें आणि तसें तूं मला स्पष्ट बोलूनहि दाखविलेंस. तरीसुद्धा मी हट्ट धरला—आणि माझ्यावरच्या प्रेमासाठी तूं विहारच्या प्रेमाचा स्वीकार केलास.

हा प्रकार प्रत्यक्ष घडून येईपर्यंत मला वाटलें होतें की, आपल्या मनावर त्याचा कांही परिणाम होणार नाही. तो घडल्यावरहि पहिले कांही दिवस मला कांही वाटलें नाही त्याचें. पण, नंतर मला केव्हा केव्हा असा संशय येऊं लागला की, माझ्यापेक्षा विहारकडे तुझा ओढा दिवसेंदिवस जास्त होत चालला आहे. मी स्वतःच्या मनाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला प्रथम.—पण त्या संशयाने बेचैन करून सोडलें मला. तूं अशा रीतीने दुरावत जावीस हें मला सहन होईना. पण, तसें बोलून दाखवावें तर आपण मत्सरी असल्याचें

दिसून येईल,या भीतीने मी गप्प बसलों. आणि मनस्ताप मुकाट्याने सोसण्याचा प्रयत्न केला.

पण त्या स्थितींत तिघांनी एकत्र राहणें मला अखेर असह्य झालें. म्हणून मी चार महिन्यांची रजा काढली आणि एकटाच प्रवासाला निघालों. तूं त्या वेळीं म्हणालीस, "मला का नाही घेऊन जात तुम्ही आपल्याबरोबर ?– तुमची प्रकृति नीट दिसत नाही. मी प्रवासांत जवळ असलेली चांगली नाही का ? "— तुला बरोबर घ्यावें असें माझ्याहि मनांत होतें. पण विहारचें मन दुखवलें जाईल,—तुला त्याच्यापासून दूर नेण्याकरिताच मी ही युक्ति योजली असें त्याला वाटेल, या भीतीने मी तुला बरोबर घेतली नाही. आपल्या तिपदरी संसाराचा प्रवासांत विसर पडेल असें वाटलें होतें मला. पण तें घडलें नाही.— तुमचीं दोघांचीं पत्रें आल्याने त्या गोष्टीची आठवण होऊन मनाला विषाद वाटे. म्हणून मी तुम्हांला पत्रें पाठविणें बंद केलें आणि माझा बदललेला पत्ताहि कळविला नाही. तरीसुद्धा तें शल्य मनाला अहोरात्र सारखें खुपेच—

अखेर कंटाळून मी परत आलों. त्या वेळीं तुला दिवस गेले होते आणि लोक नाना प्रकारच्या गोष्टी बोलत होते.

तुला तशा स्थितींत बघितल्यावर माझ्या मनाला जो धक्का बसला, त्या-पुढे जननिंदेच्या डागण्या कांहीच नव्हत. मृणा, तुझा कांही अपराध नव्हता त्यांत. तरीसुद्धा मला तें दृश्य असह्य झालें.—वाटलें की, अशा स्थितींत तुला पाहण्याचा प्रसंग येण्यापेक्षा आपल्याला प्रवासांत कुठे तरी अज्ञात मरण आलें असतें, तरी परवडतें !— मला पाहतांच तूं मान खाली घातलीस. तुझ्या त्या ओशाळलेल्या करुण दृष्टींत केवढा अर्थ, केवढा मूक धिक्कार भरलेला होता!– त्या दृष्टिक्षेपामुळे मेल्यापेक्षा मेला होऊन गेलों मी. ती सारी रात्र मी तळमळून काढली. विहार माझ्याशीं अत्यंत प्रेमाने वागला. तूं तर सारी रात्र माझी ती तळमळ कमी करण्यासाठी माझ्याशीं कांही ना कांही बोलत जागून काढलीस !– मला मात्र राहून राहून वाटे, आपण येथे परत येण्यांत चूक केली; या घरांत, या संसारांत आपल्याला थारा नाही. मृणाचें आपल्यावर अजूनही कदाचित् पूर्वीइतकेंच प्रेम असेल. पण तिच्या सहवासांत याउप्पर आपल्याला सुख

वाटणें शक्य नाही. मला एका काळीं अत्यंत प्रिय असलेला तुझा स्पर्श त्या रात्रीं जळत्या निखाऱ्याच्या चटक्यासारखा वाटला!

पण, ज्या अर्थी मी मुद्दाम परत आलों होतों, त्या अर्थी कांही दिवस तरी मला त्या घरांत राहणें प्राप्तच होतें.

विहारच्या लक्ष्यांत माझी ही मनःस्थिति तेव्हाच आली आणि मला मोकळेपणा वाटावा म्हणून तो रजा घेऊन बाहेरगावीं गेला.

आता त्या घरांत, त्या संसारांत आपण फक्त दोघेच उरलों होतों. पण मला तो एकांत आणि तें तुझें सान्निध्य हीं दोन्हीहि अगदी दुःसह झालीं.

तुझ्याहि लक्षांत आली ही माझी मनःस्थिति. पण आता ती ध्यानांत येऊन कांही उपयोग नव्हता, उपाय नव्हता!

पण, मृणा, तूं किती शहाणी, किती सहृदय! एका शब्दानं तूं कधी मला जाणीव दिली नाहीस माझ्या विचित्र कल्पनेमुळे घडून आलेल्या अनर्थाची!

मला अजूनहि वाटतें, मी केलें तें शुद्ध बुद्धीने केलें. त्याचे परिणाम मला सहन करवले नाहीत हा माझा दोष आहे, असेंहि मला वाटत नाही. स्त्रीवर मालकी हक्क गाजविण्याच्या प्रवृत्तीचे जे संस्कार आज हजारो वर्षें आमच्या रक्तांत भिनले आहेत, त्या संस्कारांनी माझा बळी घेतला, मला तुम्हां दोघांचा संसार पाहणें अशक्य केलें. माझा दोष फक्त एवढाच की, विहारला आपल्या संसारांत भागीदार म्हणून सामील करून घेतांना मी या पूर्वसंस्कारांच्या प्राबल्याची योग्य कल्पना करून घेतली नाही. त्या बाबतींतील माझा अंदाज चुकला. आणि त्याची किंमत मी आज जिवाभावाने देत आहें.

पण, मृणा, माझा तुझ्यावर राग नाही, विहारवरहि राग नाही. उलट, त्या मनस्तापाच्या भरांत मी तुम्हांला एक दिवस न कळत सोडून गेलों असतां, कार्ल्याच्या या रुग्णालयांत मी येऊन पडलों आहें असें कळतांच, तूं आपल्या अंगावरल्या मुलाला मुंबईला ठेवून माझी शुश्रूषा करण्यासाठीं येथे येऊन राहिलीस, हें तुझ्या मजवरील प्रेमाचेंच खरोखरी प्रत्यंतर होय. विहार-पेक्षा, किंबहुना त्या पोटच्या गोळ्यापेक्षा, मी तुला अजूनहि प्रिय आहें, या

कल्पनेने सध्याच्या अवस्थेंतहि मला केव्हा केव्हा धन्यता वाटते, माझ्या होरपळलेल्या मनाला गारवा वाटतो.

माझ्या आयुष्याचे क्षण झपाट्याने संपत आहेत. पण, मृणा, तुझ्या जीविताला बहर यावयाला आता नुकता कुठे प्रारंभ झाला आहे. मला जाणीव आहे, आपल्या जीवितांतलें हें रहस्य माझ्या मृत्यूनंतरहि तुझ्या हृदयांत डाचत राहील, तुझा संसार काळवंडून टाकील! पण, मृणा, तुझा यांत कांहीहि दोष नाही. दोष असला, तर तो फक्त माझा, माझा एकट्याचा आहे. कांही फुलांचे तुरे कितीहि सुंदर आणि मोहक दिसले, तरी त्या फुलांना कधीहि फळ लागत नाही; तीं फुलें फक्त पुष्पपात्रांत घालून ठेवण्यासाठीच असतात. तसेंच कांही ध्येयांचें, कांही कल्पनांचेंहि आहे. हें साधें व्यावहारिक सत्य मला उमजलें नाही, हा माझा दोष. माझ्या अपमृत्यूच्या रूपाने त्या दोषाची म्हणा वा ध्येयवादाची म्हणा किंमत मी देत आहें. त्याची झळ तुझ्या जिवाला, तुझ्या संसाराला लागतां कामा नये.

म्हणून मृणा, माझी तुला एकच शेवटची प्रार्थना आहे. माझ्या मृत्यूनंतर तूं मला आणि आपल्या जीवितांतील या रहस्यालाही विसरण्याचा प्रयत्न कर. माझी आठवण हें तुझ्या हृदयांतलें एक शल्य होऊन बसावें, माझ्या स्मृतीमुळे तुझ्या संसाराला कडवटपणा येत रहावा, या कल्पनेने माझ्या आयुष्याचे हे अखेरचे क्षण अत्यंत दुःखमय झाले आहेत. म्हणून म्हणतों, मृणा, तूं मला विसरून जा. तूं मला पूर्णपणें विसरून गेल्यानेच माझ्या प्रमाथी आत्म्याला शांति मिळेल.

सदैव तुझा
विश्राम

—नोव्हेंबर १९३९

## १० : : : वलीसाहेब

रस्त्याच्या दोहों बाजूंना असलेल्या महारोग्यांच्या रांगांतून वाट काढीत मी पुढे आलों, तोंच माझ्या कानांवर—

तुम्ही को दिल में बसा चुके हैं
निशान अपना मिटा चुके हैं
मजा मुहब्बत का पा चुके हैं
तुम्हारे गमजे उठा चुके हैं

हे गजलाचे सूर पडले.

रस्त्याच्या कडेला असलेल्या एका छोटेखानी घरासमोर ही गाण्याची मैफल रंगली होती. त्या घराचें पार्खे इतकें ठेंगू होतें की, अत्यंत नम्र झाल्याशिवाय कोणालाहि त्यांत प्रवेश करतां आला नसता. घरांत दिवा मुळी नव्हताच. कारण, ज्यांचा उपयोग घरांत व्हावयाचा, ते दोन्ही कंदील आज बाहेर बैठकीच्या जागीं आले होते. घरासमोरच्या अंगणांत दोन तीन चटया घातल्या होत्या; व त्यांवर ठेविलेल्या एकुलत्या एका फाटक्या तकियाला ओठंगून एक मियाजी बसले होते. त्यांच्या उजव्या बाजूला दुसरा एक कलंदर वीरासन घालून बसला होता. चिजेंतील प्रत्येक तानेगणिक आणि मुरकीगणिक

तो नागाप्रमाणे डुले; आपली काळीभोर दाढी कुरवाळी; व ' खूप ' ' खूप ' किंवा ' दीवारिये ' हे शब्द उच्चारून गाणारणीला उत्तेजन देत असे. आणखी-हि तीन चार मुसलमान त्या बैठकीवर जागा मिळाली तसे बसले होते. आणि ताजुद्दीनबाबाच्या दर्शनाला आलेल्या हिंदु—मुसलमान प्रेक्षकांचा घोळका त्या बैठकीभोवती गराडा घालून उभा होता. लोडाला ओठंगून बसलेल्या मियाजींच्या समोर त्या दोघी गाणारणी बसल्या होत्या. गाण्याला साथ अशी फक्त सारंगीची होती. न बाजाची पेटी, न तबलाडग्गा. मात्र जे सूर त्या सुरेल साथींतून उमटून बाहेर पडत होते, त्यांची भेदकता कांही और होती. मी तावडतोब त्या घोळक्यांतून वाट काढून अगदी बैठकीच्या जवळ आलों; व हळूच मियाजींच्या मागच्या बाजूला जमिनीवरच आसन घातलें.

धुरकटलेल्या कंदिलाचा धूसर प्रकाश गाणारणींच्या तोंडांवर पडला होता. काळयासावळयाच होत्या त्या; व अंगावर दागिनेहि नव्हते कांही. त्यांच्यापैकी धाकटी तबकांतलीं पानें घेऊन पट्टया करीत होती; व दुसरीचें गाणें या वेळीं चालू होतें. समोर बसलेल्या मियाजींनी किंवा वीरासन घालून डुल-णाऱ्या उस्तादाने तोंडाने कांही शाबासकीचा उद्गार काढला, म्हणजे ती लज्जेच्या आविर्भावाने मुरडून आपल्या मागे असलेल्या सारंगियाकडे पहात असे. तिच्या किंचित् छचोर पण कोमेजलेल्या करुण मुद्रेवर तेवढाच काय तो नाजूक भाव मधून मधून व्यक्त होत होता. ज्यांचें यौवन पुरतें उमलण्यापूर्वीच खुरटून गेलेलें होतें, अशा त्या दोन पोरी म्हणजे वारंवार हाताळून रस्त्याच्या कडेला फेकून दिलेलीं गुलबाशीचीं फुलेंच होतीं जणु कांही !

त्या गाणारणींच्या मागे घराच्या पडवींतील अंधारांत एक पांढरी पांढरी आकृति स्तब्ध बसलेली दिसत होती; व पुढच्या बाजूला असलेल्या पेट्रोमॅक्स-च्या झगझगाटांतून उरुसाच्या दंगलींतले नाना प्रकारचे आवाज सारखे कानांवर येऊन आदळत होते. त्या गाणारणीने गजल संपविला आणि आदावर्त करून ती बाजूला झाली.

त्याबरोबर ते तकियाला टेकून बसलेले मियाजी आपल्या डावीकडील मिशीला पीळ भरीत त्या पट्टया करीत बसलेल्या पोरीकडे पहात उद्गारले,

" ए नथनीवाली, तुम भी कुछ सुनाव !"

त्यांचे ते हुकमी शब्द कानांवर पडतांच किंचित् शरमल्यासारखें दाखवून ती पोर पुढे सरसावली; व तिच्या हातांतून पट्टी घेतांना मियाजींनी दाबलेलीं आपलीं बोटें हळूच सोडवून घेऊन तिने गजलाचे सूर छेडले—

करना था दगा तुमको
तो दिल न लिया होता
मंजूर था गर छिपना
तो दिल न लिया होता

तिच्या तोंडून ते गजलाचे सूर बाहेर पडले मात्र, ' वाहवा नथनीवाली,' क्या बहार है ', ' मगर दिल तो ले लिया ' वगैरे उद्गार श्रोत्यांच्या गर्दीतून बाहेर पडले.

त्या भडिमाराने ती पोर अगदी शरमून गेली आणि तिचा मधुर पण किनरा सूर कंठांतून बाहेर येईनासा झाला.

त्याबरोबर तकियाला ओठंगलेले मियाजी मिस्किलपणाने हसून तिला म्हणाले, " छोटी जान, शरमाओ मत् ! तुम्हारा सूर तो सारंगीको भी मात कर रहा है !— "

" इसमें क्या शक है ? "— " झेंपनेकी कोई जरूरत नहीं ! — "

—श्रोत्यांतून मियाजींच्या त्या उद्गाराचे प्रतिध्वनि निघाले.

तिने डोक्यावरील किंचित् मागे झुकलेला पदर सावरला आणि पुन्हा खुल्या आवाजांत गावयाला सुरवात केली.

गर जानते ये गुफ्ता ये तुमारे बेवफाईका
हरगीज न लिया होता ये नाम मोहब्बत का

हे हृदयस्पर्शी सूर तिच्या तोंडांतून निघतात न निघतात, तोंच वीरासन घालून बसलेले ते उस्ताद एकदम आरडाओरडा करून चटईवर गडबडा लोळावयाला लागले.

तिने त्याच्याकडे एकदा नजर फेकली आणि पुन्हा गजलाचे सूर उंच आवाजांत छेडले.

त्याच्या शेजारीं बसलेले मुसलमान मात्र त्याला आवरण्याचा आणि शांत करण्याचा प्रयत्न करीत होते.

मला तो प्रकार अगदी विलक्षण वाटला आणि माझ्याजवळ बसलेल्या मियाला मी विचारलें, " जनाब, ये क्या बात है ? "

तो मुसलमान विस्मयाने माझ्याकडे बघून उद्गारला, " बात क्या है ! ये तो वलीसाब हैं ! गाना सुननेसे मस्त होकर उसके जिस्ममें वलीसाब आ गये हैं ! "

तो खुलासा ऐकून मी थक्क होऊन गेलों अगदी. गाण्यामुळे मस्त होऊन वलीसाहेब अशा रीतीने अंगांत संचरलेले पाहण्याचा पहिलाच प्रसंग होता तो माझा. तो उस्ताद मधून मधून ओरडत होता, रडत होता व त्या गाणारणीच्या रोखाने गडबडा लोळत होता. पण तिने मात्र, जणु त्यांत विशेष कांही नाहीच, अशा आविर्भावाने तो गजल संपविला.

तिचें गाणें संपलें, तरी वलीसाहेब विवळतच होते. मला वाटलें, गाण्याची मैफल संपली आता.

पण तितक्यांत ते तकियाला टेकून बसलेले मियाजी पडवींतील त्या पोक्त्या आकृतीला उद्देशून म्हणाले, " बडीजान ! क्या आप इस तरफ तश्रीफ नहीं लाएंगी ? कुछ तो आप भी सुनाईए ! आपके गानेका लुत्फ बहुत दिनों से नहीं मिला है—"

त्यावर ती आकृति तिथूनच हाताने नकार दर्शवीत उद्गारली, " नहीं भय्या ! माफ करो ! मैं तो अब बहोत बूढी हो गई !—"

त्यावर ते मियाजी म्हणाले, " नहीं बडीजान नहीं ! आपल्या गाण्याची मजा कांही और आहे ! आपली एखादी तरी चीज आपण ऐकवलीच पाहिजे आम्हांला आज !—"

त्यांनीं अतिशय आग्रह केल्यामुळे ती वृद्ध स्त्री अखेर तिथून उठून बैठकीवर

येऊन बसली. तिच्या केसांची पिकून अंबाडी झाली होती, व गोऱ्यापान त्वचेला जागोजाग सुरकुत्या पडल्या होत्या. पण, कंदिलाच्या म्लान प्रकाशांतहि खुलून दिसणारी तिची पीतगौर अंगकांति पाहून मला अश्विनांतील पिवळ्या झालेल्या शेतांवर पडलेल्या सायंकालीन सूर्याच्या सोनेरी उन्हाची आठवण झाली. तिच्या रूपांत आणि आवाजांतहि जनानीपणापेक्षा मर्दानीपणाच जास्त होता; व सारंगियाला चिजेची खूण देऊन हाताच्या टाळीने ताल धरीत, तिने गजलाची तान आपल्या पहाडी भेदक आवाजांत छेडली मात्र, ऐकणारांचें काळीज अगदी कंपित होऊन गेलें !—

दिलकी चोटों ने कभी
चैन से रहने न दिया
जब चली सर्द हवा
हमने तुम्हें याद किया
मुझको कुछ होष नहीं
तुमको खबर हो शायद्
लोग कहते हैं कि तुमने
हमें बरबाद किया

गातां गातां तिच्या आवाजांत कंप उत्पन्न झाला, डोळ्यांत अश्रु उभे राहिले आणि टाळीचा तालहि मधून मधून सुटूं लागला. समोर बसलेले मियाजी, पाठीमागे बसलेला सारंगिया किंवा भोंवताली उभे असलेले प्रेक्षक यांचे धन्योद्गार तिला ऐकूं येत नव्हते; किंवा त्यांची दृष्टि आपल्याकडे किती आदरयुक्त कौतुकाने लागली आहे, याचीहि तिला जाणीव नव्हती.—मला वाटलें, त्या गजला नेतिच्या हृदयाचा भेद करून गेलेल्या कोठल्या तरी प्रसंगाचा चित्रपट तिच्या डोळ्यांपुढे उभा केला. त्या गजलांतला प्रत्येक शब्द म्हणजे तिने अनुभविलेल्या कोणत्या तरी उत्कट भावनांचे प्रतिध्वनि होते; त्या प्रतिध्वनींत तिचें स्वतःचें मन विलीन झालें होतें; व ती तन्मयतेने गात असलेल्या त्या गजलाच्या आलापांत श्रोत्यांचें मन विलीन झालें होतें. पण—

मुझको कुछ होष नहीं

ह्या गजलाचा चरण तिच्या मुखांतून बाहेर पडतांच मध्ये थोडा वेळ निश्चेष्ट पडलेले ते वलीसाहेब पुन्हा गडबडा लोळूं आणि जोरजोराने विवळूं लागले.

त्यांच्या त्या गडबडीमुळे तिची समाधि उतरली, श्रोत्यांचीहि समाधि उतरली. पण तिने शांतपणाने तो गजल संपविला. त्याच्या प्रत्येक तानेगणिक वलीसाहेबांची मस्ती वाढत होती; व दोघां तिघांनी त्यांना मोठ्या परिश्रमांनी दाबून ठेवल्यामुळेच तिला गजल संपविणें शक्य झालें.

गजल पुरा होतांच ती उठून वलीसाहेबांजवळ आली; व रागाने भुईवर लोळत असलेल्या हट्टी मुलाच्या पाठीवर जसा आईने ममतेने हात फिरवावा, तसा त्याच्या अंगावरून हात फिरवीत त्याला म्हणाली, " बेटा, शांत हो! शांत हो! तुझा जन्म कोणी बरबाद केला, हें मला माहीत नाही! पण इष्काची सारी मजा त्याच्या पायीं जन्म बरबाद होण्यांतच आहे!— "

तिचे ते शब्द ऐकतांच वलीसाहेबांची सारी गडबड थांबली.

ते अगदी स्तब्ध आणि शांत झाले.

—जुलै १९३८

## ११ : : : डॉ० अजित*

त्या प्रसंगामुळे डॉ० अजित यांच्या आयुष्याला कलाटणी मिळाली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं जेव्हा डॉ० कमलाकर नेहमीप्रमाणे त्यांच्याकडे चहाला आले, तेव्हा बंगल्याच्या मागल्या बाजूला असलेल्या बगीचांत ते फेऱ्या घालीत होते. अंगांत तपकिरी रंगाचा ऊनी वरकोट घातलेली आणि छातीशी दोन्ही हात जुळवून सकाळच्या कोवळ्या उन्हांत फेऱ्या घालीत असलेली, डॉ० अजित यांची ती विचारगंभीर मूर्ति पाहून, डॉ० कमलाकर यांना मोठें आश्चर्य वाटलें; कारण त्यांचा या वेळचा कार्यक्रम असा असे की, त्यांनी स्वतः स्टोवर चहा करावयाचा आणि तो त्या दोघां मित्रांनी गप्पा मारीत घ्यावयाचा—

म्हणून स्टोपाशी उभ्या असलेल्या त्यांच्या नोकराला डॉ० कमलाकर यांनी विचारलें, " कां रे, आज तूंसा चहा करतो आहेस, किसन ? साहेबां-ची तब्बेत बरी नाही का ? "

" तब्बेत तर नेहमीसारखीच दिसते; पण काल सारी रात्र जागून काढली साहेबांनी — "

---

* पृष्ठ ९ वरील " रातराणीचीं फुलें " या गोष्टीचा उत्तरार्ध.

" कां ! कांही वाचीत होते वाटतं ! कीं प्रयोगशाळेंत काम करीत होते ? —"

" नाही जी ! प्रयोगशाळेंत साहेब काम करीत असते, तर मलाही जागवलं असतं त्यांनी आपल्याबरोबर ! ते मधून मधून अंथरुणावर पडत न् मधून मधून फेऱ्या घालीत. पहाटे लागला असावा डोळा त्यांचा थोडासा; पण मग उठवावं लागलं मला त्यांना त्यांच्या हुकुमाप्रमाणं. उठल्याबरोबर त्यांनी व्यायाम घेतला, स्नान केलं, कपडे घातले न् पुन्हा फेऱ्या सुरू झाल्या ! नेहमी पहाटे उठल्याबरोबर ते चहा घेतात; तोसुद्धा घेतला नाही आज त्यांनी—"

किसनने सांगितलेली ही हकिगत ऐकून डॉ॰ कमलाकर मुकाट्यानें मागल्या अंगणांत आले; व एका फुलवेलीच्या कुंडीजवळ उभ्या असलेल्या आपल्या मित्राच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाले—

" काय रे. कसला विचार करतो आहेस तूं आज एवढा, अजित ?—"

" तसं विशेष कांही नाही, कमलाकर ! कांही वनस्पति अशा असतात की, त्यांना फुलं येतात, पण तीं नुसतीं गळून जातात; फळ कधीच धरीत नाहीत !— त्या वनस्पतींना फळं लागण्यासाठी कोणता प्रयोग करून पहावा, याचा विचार करतो आहे मी !—"

" केव्हापासून करतो आहेस तूं हा विचार ? "

" काल रात्रीपासून—"

" तुझ्या पाहण्यांत अशी एखादी वनस्पति कालच आली वाटतं ? "

" तसं नव्हे रे ! " डॉ॰ अजित खिन्नपणाने हसून म्हणाले. " तुला मानसशास्त्रांतला एक नियम माहीत आहे ना कमलाकर ? मनाला वेध लावणाऱ्या एका गोष्टीवरून पूर्वी पाहिलेल्या सदृश गोष्टीची उत्कटतेने आठवण होते.— तसं झालंय् माझं ! "

" काल बघितलेल्या कोणत्या सदृश गोष्टीवरून आठवण झाली ही तुला ?—"

पण डॉ० अजित यांनी डॉ० कमलाकर यांच्या या प्रश्नाला कांही उत्तर दिलें नाही.

क्षणभराने ते म्हणाले, " आंत चल; चहा तयार केला असेल बहुतेक किसननं—"

" मी आंत येतों; पण किसनच्या हातचा चहा मात्र मी घेणार नाहीं, अजित! माझा नियम तुला माहीतच आहे. मी दोनच माणसांच्या हातचा चहा घेत असतों—"

" एक माझ्या हातचा—"

" आणि दुसरा निर्मलेच्या हातचा! घरांत इतके नोकर आहेत; पण माझा नियम आहे की, माझ्यासाठी चहा माझ्या बायकोनं तयार केला पाहिजे, माझं जेवण तिनं तयार केलं पाहिजे न् तिनंच तें वाढलं पाहिजे! तिच्याशिवाय जिच्या हातचा चहा मला चालतो, अशी आणखी एकच व्यक्ति दुनियेंत आहे. आणि ती म्हणजे तूं! "

" तूं भावनांचा गुलाम आहेस, कमलाकर! " हा डॉ० अजित यांच्या तोंडून अशा कोणत्याही प्रसंगीं बाहेर पडणारा उद्गार आजहि आपल्याला ऐकावा लागणार, अशी अपेक्षा होती डॉ० कमलाकर यांची.

पण डॉ० अजित तसें कांहीच बोलले नाहीत. त्यांनी मुकाट्याने त्या पेटलेल्या स्टोवरून दुधाचें भांडें उतरून त्यावर ताजें आधण ठेवलें.

खोलीच्या मधोमध ठेवलेल्या प्रशस्त टेबलावर चहाचें सर्व सामान व्यवस्थित मांडलेलें होतें; व उकडलेलीं अंडीं, काळा खजूर, टोमॅटोच्या फोडी, लोणी लावलेला टोस्ट वगैरे चहाबरोबर खावयाचे पदार्थ निरनिराळ्या प्लेट्स्-मधून ठेवलेले होते.

त्यांपैकी एका प्लेटमधील खजुराची बी तोंडांत टाकीत डॉ० कमलाकर डॉ० अजित यांना म्हणाले, " आज मी तुझ्याबरोबर तुझ्या नव्या रोग्याकडे येणार आहें—"

"कशासाठी ?–पण मी ती केस सोडून दिली, कमलाकर! आता आपल्या-

ला जाण्याची गरज नाही पुन्हा तिथं— "

—डॉ० अजित एकदम त्यांच्याकडे वळून उद्गारले.

" अजित, काय बोलतो आहेस तूं हें ? कां सोडलीस तूं ही केस ? ती सोडून देण्यापूर्वी मला कळवायला नको होतास का तूं हा आपला बदललेला विचार ? — "

" पण तितका विचार करायला वेळच मिळाला नाही मुळी मला, कमलाकर ! काल रात्रीं मी तिथून घरीं आलों न् ठरवून टाकलं की पुन्हा कांही तिथं जायचं नाही— "

" तुला नसेल जायचं ! पण माझं कांही चालणार नाही रायबहादुरांकडे गेल्याशिवाय, अजित ! गेलीं पांच वर्षं मी त्यांचा डॉक्टर आहें. मला जावंच लागेल पुन्हा त्यांच्याकडे. आणि रायबहादुर जेव्हा मला तुझ्याबद्दल विचारतील, तेव्हा मी काय सांगूं त्यांना ? —"

" त्यांना सांग,— डॉ० अजित यांचा सपशेल पराभव केला तुमच्या पत्नीनं !—"

इतक्या वेळांत डॉ० अजित पहिल्यांदाच मोठ्याने हसून उद्गारले.

पण त्या हसण्यांत केवढा उपरोध, केवढी तीव्र मनोवेदना भरलेली होती ! तें वाक्य उच्चारून त्यांनी चहा ओतावयाला सुरवात केली.

त्यांचें चहा ओतणें संपल्यावर डॉ० कमलाकर त्यांच्याकडे रोखून पहात त्यांना इंग्रजींत म्हणाले, " अजित, तूं ही केस कां सोडलीस हें सांगशील मला प्रामाणिकपणानं ? — "

त्याबरोबर तोंडाशी नेलेला चहाचा कप एकदम खाली ठेवून डॉ० अजित उद्गारले, " कमलाकर, तुझ्याशीं आजपर्यंत कधी तरी अप्रामाणिकपणानं वागलों आहे का मी ? —"

त्यांचा तो लांबट, गोरापान, करारी चेहरा बोलतां बोलतां रागाने लाल होऊन गेला.

त्यांनी तो रागाने विचारलेला प्रश्न ऐकून डॉ० कमलाकर यांना मेडिकल कॉलेजांतील शिक्षण संपल्यावर, अनुभव घेण्यासाठी ते दोघे हॉस्पिटलमध्ये काम करीत असतांना, घडलेल्या एका चमत्कारिक प्रसंगाची आठवण झाली. एक दिवस रात्रपाळीच्या वेळीं डॉ० अजित यांच्याबरोबर असलेल्या एका अँग्लो-इंडियन परिचारिकेने त्यांनी आपल्या तोंडांत मारल्याबद्दल हॉस्पिटल-च्या वरिष्ठांकडे तक्रार केली. त्या तक्रारीबद्दल लेखी खुलाशाची मागणी करणारें वरिष्ठांचें पत्र जेव्हा डॉ० अजित यांच्याकडे आलें, त्या वेळीं त्यांची जी संतप्त मुद्रा आपण बघितली होती, तीच आज किती तरी वर्षांनी आपण पुन्हा पहात आहोंत, असा भास डॉ० कमलाकर यांना झाला. त्या नर्सने डॉ० अजित यांच्यावर लुब्ध होऊन त्यांच्याशीं लगट करण्याचा प्रयत्न केला; व त्या अति-प्रसंगाची चीड येऊन जेव्हा डॉक्टरांनी तिच्या श्रीमुखांत भडकावली, तेव्हा त्यांनी आपला विनयभंग केल्याचें गाऱ्हाणें तिने वरिष्ठांकडे नेलें. डॉ० अजित यांच्या निर्दोषित्वावर त्यांचा विश्वास बसेना. पण, मेडिकल कॉलेजचे युरोपियन प्रिन्सिपॉल डॉ० ॲलन् यांचा आपल्या या बुद्धिमान् विद्यार्थ्यावर अतिशयच लोभ होता; व त्यांनी मध्यस्थी केल्यामुळेच डॉ० अजित हे त्या प्रकरणांतून फारशी झळ न लागतां निसटले. मात्र त्या दोघांहि मित्रांना त्या हॉस्पिटलची लवकरच रजा घ्यावी लागली.

त्या प्रकरणामुळे डॉ० अजित यांचें मन इतकें कांही दुखावलें गेलं होतें की, त्यांच्या प्रामाणिकपणाविषयी कोणी थोडी जरी शंका घेतली, तरी त्यांना अतिशय चीड येत असे—

आणि आज तर तशी शंका त्यांच्या एकुलत्या एका जिवलग मित्राने घेतली होती:

" मी तुला अप्रामाणिक कसा म्हणेन, अजित ? मी तशा अर्थानं बोललों नाहीं तें. पण पहिल्या दिवशीं आपण सुमनबाईला पाहून परत फिरल्या-वर मी तुला जें बोललों होतों तें लक्षांत— "

" हो, माझ्या लक्षांत आहे चांगलं. त्या वेळीं तुझ्या त्या बोलण्याचा राग आला होता मला, कमलाकर ! माझी अशीच प्रामाणिक समजून होती

की, तिच्याविषयी जें चमत्कारिक कुतूहल माझ्या मनांत पहिल्या सपाट्याला उत्पन्न झालं, त्याचं कारण केवळ तिच्या त्या विचित्र दुखण्याचं निदान करण्याची जिज्ञासा! पण मागाहून माझ्या ध्यानांत आलं— "

" काय ध्यानांत आलं?—"

" तूं थट्टेनं जें सूचित केलंस तें खरंच होतं. त्यापूर्वी कोणत्याहि स्त्रीला पाहून माझ्या मनांत जी भावना कधी उद्‌भूत झाली नव्हती, त्या भावनेनं आपलं मन व्यापलं आहे—"

" पण म्हणून केस सोडून द्यायचं काय कारण? उलट जास्त आपुलकीनं तूं उपचार करायला हवे होतेस—"

" खरं आहे तुझं म्हणणं. पण मला राहवलं नाही. मी काल तिला स्पष्ट सांगितली माझी मनःस्थिति— "

" तिनं काय उत्तर दिलं तुला? "

मी तिला सरळ विचारलं, " तूं रायबहादुरांशीं घटस्फोट करून माझ्याशीं लग्न करतेस का म्हणून! पण तिनं नकार दिला—"

" आणि म्हणून तूं पुन्हा तिचं मुखावलोकन करायचं नाही असं ठरवलंस? छान! तुला तिच्याशीं स्नेह ठेवणं शक्य नव्हतं, अजित? त्याला तर हरकत नव्हती ना तिची? "

" असल्या स्नेहाचे शेवटीं काय परिणाम होतात, हें माहीत आहे तुला कमलाकर! तशा प्रकारचा चोरटा व्यवहार करणं माझ्यासारख्या माणसाला अशक्य आहे— "

डॉ॰ अजित यांच्या कानशिलांवर पुन्हा रक्त उसळलें.

क्षणभर दोघेही स्तब्ध होते.

नंतर डॉ॰ कमलाकर त्यांना म्हणाले, " मग पुन्हा कधी जायचं नाही म्हणतोस सुमनबाईकडे? — "

" नाही. आपण डॉक्टर लोक दूषित अवयव अजिबात कापून टाकणंच

श्रेयस्कर समजतों, नाही का ? माझीसुद्धा ही मानसिक शस्त्रक्रियाच आहे एक प्रकारची !— ”

“ पण कांही रोग असे असतात की, शस्त्रक्रिया केल्यावर कांही काळ जरी ते निर्मूल झाल्यासारखे दिसले, तरी कालांतरानं त्यांचा पुन्हा उद्भव होतो. तसं या बाबतींत होईल अशी भीति वाटते मला, अजित ! ”

— २ —

आपल्या मित्राची ती प्रणयविवशता पाहून डॉ० कमलाकर यांना पराकाष्ठेचें नवल वाटलें.

एका काळीं स्त्रीद्वेष्टा म्हणून गाजलेला आपला हा मित्र परितशी उलटल्यावर सुमनसारख्या प्रौढ स्त्रीच्या प्रेमपाशांत कसा सापडला ? कॉलेजांत असतांना आणि नंतरहि डॉ० अजित हे स्त्रीसौंदर्याचें अस्तित्वच मुळी नाकारीत असत. स्त्रीसौंदर्य ही केवळ एक कविकल्पना, कामुक ललित लेखकांनी निर्माण केलेलें तें एक पद्धतशीर खूळ आहे, असें ते नेहमी म्हणावयाचे; व आपल्या या मताच्या समर्थनार्थ शौपेनहोअरपासून ब्लॉशपर्यंत अनेक शास्त्रज्ञांच्या विधानांचा आधार ते देत असत. सबंध जीवसृष्टींत नर हा मादीपेक्षा सुंदर असतो. अर्थात् पुरुष हाच स्त्रीपेक्षा निसर्गतः सुंदर असला पाहिजे; स्त्रीला तो आपल्यापेक्षा सुंदर समजतो, हा केवळ कामवासनेचा विकृत प्रभाव आहे, असें ते आवेशाने प्रतिपादीत असत. आणि खरोखरीच कॉलेजांत असतांना, इतक्या विद्यार्थिनींशीं आणि परिचारिकांशीं निकट संबंध आला असतां डॉ०अजित यांना चुकूनहि कधी मोह पडला नाही. इतकेंच नव्हे, तर त्यांचे सहाध्यायी आणि परिचारिका यांच्यांत जीं प्रणयचेष्टितें उघड उघड चालत, त्यांच्याविषयी डॉ० अजित हे अगदी तिटकाऱ्याने बोलावयाचे !

आपल्या वयाची पस्तीस वर्षें अशा एकाकी, प्रणयवर्ज्य स्थितींत काढलेला हा रुक्ष वैज्ञानिक चाळिशीच्या घरांत असलेल्या एका प्रौढ, रोगट स्त्रीवर एकाएकीं लुब्ध व्हावा, हा चमत्कार नव्हे काय ?

कॉलेजांत असतांना घडलेल्या त्या हृदयस्पर्शी प्रसंगाची कमलाकरांना आठवण झाली.

ते दोघे कॉलेजच्या शेवटच्या वर्षांत असतांना हजारो वर्षांपूर्वी देशो-धडीला लागलेल्या ज्यूंना त्यांची पितृभूमि परत मिळवून देणारा जगद्-विख्यात रसायनशास्त्रज्ञ डॉ० विझमन् याची गोष्ट त्यांच्या वाचण्यांत आली. १९१६ सालीं महायुद्ध ऐन जोरांत असतां दारूगोळा तयार करण्यासाठी अत्यंत अवश्य असलेल्या " ॲसेटोन " ( Acetone ) नांवाच्या द्रव्याचा इंग्लंडांत तुटवडा पडला. तें द्रव्य कसें पैदा करावें, या विवंचनेंत ब्रिटिश मुख्य प्रधान लॉयड जॉर्ज हे असतां, मँचेस्टर विद्यापीठांत प्राध्यापक असलेल्या या तरुण शास्त्रज्ञाचें नांव त्यांना सुचविण्यांत आलें. लॉयड जॉर्ज यांनी त्या प्राध्यापकाला आपल्या भेटीला बोलावून सांगितलें, " मला शक्य तितक्या लवकर, अगदी ताबडतोब तूं ' ॲसेटोन ' पैदा करून दाखविलें पाहिजेस ! " विझमनने अहोरात्र प्रयोग करून चेस्टनटपासून तें द्रव्य उत्पन्न करण्याची पद्धत शोधून काढली; व अशा रीतीने इंग्लंडला मोठ्या आपत्तींतून वाचविलें. युद्ध संपल्यावर लॉयड जॉर्ज यांनी या वैज्ञानिकाला बोलावून म्हटलें, " विझ-मन्, तूं राष्ट्राची महनीय सेवा केली आहेस. तूं जो म्हणशील तो बहुमान तुला राजेसाहेबांकडून मिळेल ! " त्यावर विझमनने विनयाने उत्तर दिलें, " मला स्वतःसाठी कांहीसुद्धा नको ! मला फक्त एकच गोष्ट पाहिजे. ती म्हणजे माझ्या परागंदा झालेल्या देशबांधवांना त्यांचें स्वतःचें घर, त्यांची पितृभूमि परत मिळावी ! "

आणि, ब्रिटिशांच्या ताब्यांत पॅलेस्टाईन येतांच, लॉयड जॉर्ज यांनी विझमनच्या या मागणीनुसार ज्यूंना त्यांच्या या प्राचीन पितृभूमींत वसाहत करण्याची, अभिनव ज्यूराष्ट्र निर्माण करण्याची सनद दिली. डॉ० अजित यांनी ज्या दिवशीं बाल्फोर-घोषणेबरोबर वृत्तपत्रांतून आलेली डॉ० विझमनच्या देशभक्तीची ही अद्भुत कथा वाचली, त्या दिवशीं सर्व रात्रभर त्यांना झोप आली नाही.

देशोधडीला लागलेल्या आणि साऱ्या युरोपच्या अवहेलनेचा विषय

होऊन बसलेल्या पददलित, निराधार ज्यूंना एका वैज्ञानिकानें आपलं पितृदेश परत मिळवून दिला. आपल्यालाहि आपल्या मायदेशासाठी कांही करतां येणार नाही काय? जगदीशचंद्र बोस, चंद्रशेखर रमण, मेघनाद सहा प्रभृति शास्त्रज्ञांनी आपआपल्या जन्मभूमीचें नांव सर्व जगभर गाजविलें. तसें महाराष्ट्राचें नांव आपल्याला उज्ज्वल करतां येणार नाही काय? औद्योगिक क्षेत्रांत मागसलेला दरिद्री महाराष्ट्र– त्याच्या उन्नतीसाठी आपण आपल्या बुद्धिमत्तेचा उपयोग करूं शकणार नाही काय?

— या कल्पनांनी डॉ० अजित यांच्या डोक्यांत त्या दिवशीं थैमान घातलें आणि साऱ्या रात्रभर त्यांना झोप आली नाही.

सकाळीं उठल्याबरोबर त्यांनी कमलाकरांना सांगितलें, "मी अविवाहित राहून संशोधनांत सर्व आयुष्य घालविणार." त्या त्यांच्या अविवाहित राहण्याच्या कल्पनेचें आपल्याला त्या वेळीं कसें हसूं आलें होतें, याची कमलाकरांना आज आठवण झाली!

पण डॉ० अजित यांनी शिक्षण पूर्ण झाल्यावर ती कल्पना अक्षरशः अंमलांत आणली. त्यांचें शस्त्रक्रियेंतील नैपुण्य पहिल्या प्रतीचें होतें; व नागपुरास आल्यावर त्यांनी जर दवाखाना काढला असता, तर हजारो रुपयांची कमाई ते करूं शकले असते. पण दवाखाना न उघडतां त्यांनी मेडिकल स्कूलमध्ये अध्यापकाची जागा पत्करली; व धनतोलीच्या एका टोकाला एक एकर जमीन खरेदी करून तेथे संशोधनाला प्रारंभ केला. त्यांची प्रयोगशाळा, प्राणी आणि वनस्पति यांचें छाटेखानी संग्रहालय, विशिष्ट दृष्टीने तयार केलेला बगीचा व आयुर्वेदिक पद्धतीने उपचार करण्यासाठी उघडलेला प्रायोगिक मोफत दवाखाना हे लोकांच्या कुतूहलाचे विषय होऊन बसले होते. त्यांचे कांही आवडते निष्ठावंत विद्यार्थी आणि कमलाकरांसारखे त्यांचे दोनतीन डॉक्टर स्नेही यांनाच फक्त त्यांच्या बंगल्यांत जावयाला मुभा होती. कॉलेजांतील कामाव्यतिरिक्त त्यांचा उरलेला सारा वेळ संशोधनांत आणि प्रयोगांत जात असे. त्यांचें तें ध्येयार्पित एकाकी जीवन– त्यांत जिज्ञासा आणि देशोन्नतीची तळमळ यांच्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि भावनेला आजवर थारा मिळाला नव्हता

ऐन तारुण्याचीं बारा वर्षे अशा रीतीने एकान्तांत आणि संशोधनांत काढल्यावर डॉ० अजित हे आज एकाएकीं प्रेमपाशांत सापडावे आणि तेहि जिचें यौवन कोळपून गेलें होतें अशा एका प्रौढेच्या !

तो अचानक मनांत उद्भवलेला प्रेमांकुर उपटून टाकण्याचा डॉ० अजित यांचा निर्धार यशस्वी झाला नाही, हें डॉ० कमलाकर यांच्या दोन तीन दिवसांतच लक्षांत आलें. हातीं घेतलेल्या कामाच्या बाबतींतील त्यांची आजपर्यंतची कठोर एकाग्रता नाहीशी होऊन त्यांच्या दृष्टींत आणि वृत्तींत एक प्रकारची अनवधानता, विमनस्कता डोकावूं लागली होती.

त्यानंतर तिसऱ्याच दिवशींची गोष्ट. डॉ० कमलाकर यांना एका नाजूक शस्त्रक्रियेच्या बाबतींत त्यांचें सहाय्य पाहिजे होतें. डॉ० अजित नेहमीप्रमाणे अगदी वेळेवर त्यांच्या हॉस्पिटलांत हजर झाले. पण, शस्त्रक्रिया करतांना, कोणत्या कारणामुळे असेल तें असो, रोग्याच्या पोटावर भलत्याच ठिकाणीं चिरा दिला गेला; व रक्तस्रावामुळे रोग्याची हृदयक्रिया बंद पडण्याची भीति उत्पन्न झाल्याकारणाने अखेर ती जखम तशीच शिवून टाकून शस्त्रक्रिया तहकूब करावी लागली. त्या प्रकारानंतर शस्त्रक्रियेच्या खोलींतून निघून डॉ० अजित हे जेव्हा डॉ० कमलाकर यांच्या खाजगी खोलींत येऊन बसले, तेव्हा त्यांचा चेहरा घामाने डबडबला होता; त्यांच्या त्या तेजस्वी तीक्ष्ण डोळ्यांतील दीप्ति मंदावली होती; व एकांत एक बोटें घालून घट्ट गुंतविलेले त्यांचे हात, एखाद्या म्हाताऱ्याच्या निर्बाण हातांसारखे, थरथरा कापत होते.

डॉ० कमलाकर यांनी आपली सिगारेट–केस त्यांच्यापुढे केली; व त्यांनी सिगारेट तोंडांत धरल्यावर ती शिलगावून देतांना ते हळूच म्हणाले, "अजित, तूं व्यर्थ कोंडमारा करतो आहेस आपल्या मनाचा ! तुझ्यासारख्या मानसशास्त्रज्ञाने तरी असल्या वर्तनाचे अनिष्ट परिणाम लक्ष्यांत घ्यायला हवे होते ! आज तुझ्या हातून केवढी विलक्षण चूक झाली !— "

" होय. माझ्यावर खटला भरायलासुद्धा हरकत नाही या प्राणघातक चुकीबद्दल ! पण कमलाकर, मी काय करूं ? मी सारखा धडपडतों आहें; माझ्या मनाशीं अहोरात्र झगडतों आहें. पण मला कांही विसर पडत नाही तिचा—"

" अजित, ही भाषा शोभत नाही तुझ्या तोंडीं ! बारा वर्षांपूर्वी कोणत्या आकांक्षा मनांत धरून न् कोणत्या निर्धारानं तूं आयुष्याला प्रारंभ केलास, याची आठवण कर ! ती काय अशी लोकोत्तर स्त्री लागून गेली आहे की, जिच्यामुळं तुझ्या आयुष्याची नासाडी होण्याचा प्रसंग यावा ? तिच्यापेक्षा शतपट सुंदर आणि हुषार तरुणी आज तुझ्या प्रेमासाठी आतुर आहेत— "

" हा प्रश्न सौंदर्याचा किंवा हुषारीचा नाही, कमलाकर ! मानसिक साधर्म्याचा, अदृष्ट अशा स्वसंवेद्य लाग्याबांध्यांचा आहे. या मनोव्यथेमुळं माझ्या ध्येयापासून मी च्युत होत आहें, याची जाणीव माझ्या मनाला सारखी बोचते आहे. दृष्टादृष्ट झाल्यापासून दोन तासांच्या आंत ज्या स्त्रीनं माझं मन व्यापलं, तिची माझ्या मनावरली पकड नाहीशी व्हायला ती किंवा मी दोहों-पैकी कोणीतरी एक जगांतून नाहीसं होणंच खरोखरी जरूर आहे—"

डॉ० अजित यांचे ते उद्गार ऐकून डॉ० कमलाकर क्षणमात्र स्तंभित झाले; त्यांनी आपल्या तोंडांतील सिगारेट काढून रक्षापात्रांत टाकली; व आपल्या त्या जिवलग मित्राकडे एकवार न्याहाळून पाहिलें.

डॉ० अजित अगदी शांत होते. पण त्या शांततेंत त्यांच्या मूक मनो-वेदनेची तीव्रता ओतप्रोत भरलेली होती.

डॉ० कमलाकर त्यांच्या जवळ आले; व त्यांच्या खांद्यांवर हात ठेवून म्हणाले, " अजित, आपण मुंबईला जाऊं या सात आठ दिवस ! पुढच्या आठवड्यांत चौरंगी सामने सुरू होताहेत—"

" पण पलिकडल्या खोलींतल्या त्या रोग्याची काय व्यवस्था ? "

" ती शस्त्रक्रिया उद्या पुरी करूं आणि त्याला थोडा आराम पडल्यावर जाऊं— "

" ठीक आहे. जशी तुझी मर्जी !"

— ३ —

दुसऱ्या दिवशीं सकाळीं डॉ० कमलाकर जेव्हा नेहमीप्रमाणे डॉ० अजित यांच्याकडे आले, तेव्हा किसन त्यांना सलाम करून म्हणाला, " साहेब अजून उठले नाहीत आज !—"

" का रे ? आजारी आहेत कीं काय ? "

" नाही. पहाटेपर्यंत खोलींत आणि बगिच्यांत फेऱ्या घालीत होते. नंतर खोलींत जाऊन निजले, ते बाहेर आले नाहीत अजून—"

डॉ० कमलाकर यांनी मुकाट्याने डाव्या बाजूच्या खोलीचा दरवाजा हळूच किलकिला केला.

डॉ० अजित गाढ झोपेंत असल्याचें त्यांच्या दृष्टीस पडलें.

त्यांना वाटलें, आपण आल्यापावलीं परत जावें—

तोंच पलिकडल्या खोलींतील टेलिफोनची घंटा खणखणली आणि डॉ० अजित जागे झाले—

किसन फोन घेत होता—

" अजित, तुझी प्रकृति बरी नाही का आज ?"

डॉ० कमलाकर यांनी त्यांचा हात आपल्या हातांत घेण्याचा प्रयत्न करीत विचारलें.

पण आळस देण्याच्या मिषाने हात झटकन् वर करून डॉ० अजित उद्गारले—

" काल फार उशिरा निजलों, म्हणून आज उशीर झाला उठायला थोडासा ! तुला येऊन किती वेळ झाला ?"

" फार तर दहा मिनिटं—"

" कोणाचा फोन आहे रे किसन ? "

त्यांनी खोलींतून बाहेर आल्यावर विचारलें.

" डॉ० फर्नांडिसचा. एका अडलेल्या बाईचं ऑपरेशन आहे, तर तुम्ही मदतीला येतां का, म्हणून विचारते आहे ती ! — "

" कमलाकर, पहा रे तिचं काय म्हणणं आहे तें ? मी तोंड धुवून येतों तोंपर्यंत— "

आणि ते तसेच पुढे सटकले.

आजपर्यंत डॉ० अजित यांनी हॉस्पिटलमधून आलेला कोणताही निकडी-

चा फोन अशा तऱ्हेने टोलवला नव्हता. " हा कांही पूर्वीचा कर्तव्यदक्ष अजित नव्हे ! " फोन उचलतां उचलतां डॉ० कमलाकर यांच्या मनांत आलें.

फोनवरील बोलणें संपवून डॉ० कमलाकर आंतल्या खोलींत आले, तेव्हा डॉ० अजित चहा करीत होते. आणि किसन बाजूच्या टेबलावर प्रातरुपाहाराची तयारी करीत होता.

" काय सांगितलंस फर्नांडिसला ? — "

" मी तिला सांगितलं तुझी प्रकृति आज ठीक नाही म्हणून ! — "

" खोटं कां सांगितलंस तूं, कमलाकर ? — "

" खोटं नाही सांगितलं. खरंच बोललों मी अक्षरशः ! अजित, तुझी प्रकृति खरोखरीच बिघडली आहे. गेल्या बारा वर्षांत एकदाहि कधी तुला अशा रीतीनं वागतांना मी पाहिला नव्हता. डॉ० विझमनचं उदाहरण डोळ्यांपुढं ठेऊन प्रयोगशाळा काढणारा तूं वैज्ञानिक ! – एका सामान्य स्त्रीच्या नादानं तुझी अशी अवस्था होईल असं स्वप्नांतहि आलं नव्हतं कधी माझ्या ! — "

" कमलाकर, तूं उत्तम डॉक्टर आहेस हें खरं. पण एक गोष्ट लक्षांत आलेली नाही अद्याप तुझ्या— "

" कोणती रे ? "

" जो मनुष्य नेहमी नेहमी आजारी पडतो, तो सहसा दगावत नाही कितीहि मोठं दुखणं आलं तरी. सततच्या आजारांनी त्याची प्रतिकारशक्ति चिवट होऊन जाते. पण निकोप प्रकृतीच्या धडधाकट माणसाला जेव्हा अचानक दुखणं येतं, तेव्हा तो प्रतिकार करूं शकत नाही त्या रोगाच्या प्रभावाला, हें आपण नेहमी पाहतों. तसंच झालंय् माझं ! गेल्या पस्तीस वर्षांत माझ्या मनाला कधी प्रेमभावनेचा स्पर्श झाला नाही. त्यामुळं माझं मन आता झपाटल्यासारखं झालं आहे अगदी ! मी तुला कालच सांगितलं ना कमलाकर, माझा किंवा तिचा अंत झाल्याशिवाय हें वेड कमी व्हायचं नाही म्हणून ! "

" अजित, तूंच का बोलतो आहेस ही भाषा ? स्त्रीसहवास ही केवळ एक शारीरिक गरज आहे असं म्हणणारा तूं ! आजपर्यंत तुला स्त्री कधी आकर्षक वाटली नाही. आणि तो तूं आज एका वयस्क स्त्रीच्या नादानं आपल्या कर्तव्या-

क्षा आणि आकांक्षांना पारखा होतो आहेस ! का रे, प्रेम ही एक रासायनिक प्रक्रिया आहे असं म्हणत असस ना तूं कॉलेजांत असतांना ? त्या प्रक्रियेनं तुझ्यासारख्या वैज्ञानिकाचं रक्त इतकं गरम करून सोडावं, हा चमत्कार आहे खरोखरी ! — "

" कमलाकर, माझीं जुनीं मतं माझ्या तोंडावर फेकून कांही उपयोग व्हायचा नाही माझ्या सध्याच्या स्थितींत ! तूं म्हणतोस तें खरंच आहे सगळं ! प्रेमाला रासायनिक प्रक्रिया म्हणणारा मी–माझं रक्त आज प्रणयविकारानं गरम होऊन उसळतं आहे याची शरम वाटत नाही मला ! मी मानसशास्त्राचं अध्ययन केलं असलं, तरी स्वतःचं मन ही काय चीज आहे, हें मला आज प्रथमच कळतं आहे! मी आज कसा वागतों आहें हें मला समजत नाही असं वाटतं का तुला ?– भलत्याच जागीं चिरा दिलेल्या त्या माणसाचीं आंतडीं, एखाद्या पिशवींत कोंबावीं त्याप्रमाणं, कशींबशीं आंत ढकलून मी त्याची जखम शिवली, तेंव्हा मला मरणप्राय खंत वाटली त्या माझ्या चुकीबद्दल ! फर्नांडिसचा फोन मी मघाशी तुला घ्यायला सांगितला, तो माझा स्वतःच्या नैपुण्यावरला विश्वास ढासळला म्हणून ! माझी किती अधोगति झाली आहे याची मला जाणीव आहे पुरेपूर ! आज तें कालचं अपुरं राहिलेलं ऑपरेशनसुद्धा पुरं करायला येणार नाही मी तुझ्या हॉस्पिटलमध्ये ! " —

" अजित !—"

" कमलाकर, तूं अशा रीतीनं बघूं नकोस माझ्याकडे ! पुन्हा माझ्या हातून कांही चूक झाली तर ? त्यापेक्षा तूर्त कांही दिवस मी शस्त्रक्रियेच्या भानगडींत न पडलेलं बरं !–– "

डॉ॰ कमलाकर कांही क्षण अगदी स्तब्ध होते.

थोड्या वेळाने ते म्हणाले, " अजित, मी स्वतः जाऊन बोलूं का एकदा सुमनबाईशीं या बाबतींत ?— "

" कशाला? काय उपयोग आहे बोलून ? ती घटस्फोटाला कधींही तयार व्हायची नाही याबद्दल खात्री आहे माझी— "

" मग कसा मार्ग निघेल यांतून ?— सुमनच्या ऐवजी दुसरी एखादी स्त्री— "

" दुसरी एखादी स्त्री ?— वेडा आहेस तूं कमलाकर ! माझं मन तळमळ-तंय् तें सुमनसाठीं; दुसऱ्या स्त्रीसाठी नव्हे ! पण का रे, आपण मुंबईला केव्हा जायचं ?— "

त्यांनी विषय बदलल्याचें लक्ष्यांत आलें कमलाकरांच्या. ते एक दीर्घ उसासा सोडून उद्गारले—

" मुंबईला बहुधा उद्या संध्याकाळीं निघूं. आज त्या शस्त्रक्रियेचा राग-रंग कसा काय आहे तें पाहतों न् तुला संध्याकाळीं कळवितों—"

— ४ —

डॉ० कमलाकर संध्याकाळीं जेव्हा डॉ० अजित् यांना भेटावयाला आले, तेव्हा किसन व्हरांड्यांत उभा असलेला त्यांना दिसला.

" का रे, साहेब काय करताहेत ?—"

" प्रयोगशाळेंत आहेत— "

" मग तूं इथं कसा ?— "

" त्यांनी मला सांगितलंय् की तुझी जरूर लागेल तेव्हा घंटी वाजवीन मी ! कोणाला आंत सोडायची परवानगीहि नाही आज. घरीं नाहीत म्हणून सांग, असं बजावून ठेवलंय् त्यांनी मला— "

" मलासुद्धा परवानगी नाही आंत जायची ?"

किसन किंचित् घुटमळून उद्गारला, "नाही साहेब, असं कसं होईल? "

" केव्हापासून बसला आहे तो प्रयोगशाळेंत ? "

" अस्पतालांतून आल्यापासून. आता अडीच तास तरी झाले असतील-"

" एवढा वेळ काय करतो आहे आज हा तिथं एकटाच ?—"

ते स्वतःशींच पुटपुटले आणि त्यांनी प्रयोगशाळेकडे पाहिलें.

त्यांच्या एकदम लक्षांत आलें —

— आता सूर्य मावळून बराच अंधार पडला होता, तरीहि प्रयोग-

शाळेंतील दिवा लागलेला नव्हता !—

— त्याबरोबर त्यांच्या काळजांत धस्स झालें.

ते धावतच प्रयोगशाळेकडे गेले.

त्यांनी दार उघडण्याचा प्रयत्न केला —

पण तें आंतून बंद असल्याचें त्यांच्या अनुभवाला आलें.

तेव्हा व्हरांड्यांतील एक खुर्ची त्यांनी झट्कन् दाराजवळ ओढली. तिच्यावर उभे राहून त्यांनी दाराला असलेल्या हवाकशांतून आंत हात घातला; व थोड्याशा खटपटीने बोल्ट काढून दार उघडलें.

त्यांनी आंत पाऊल ठेवतांच, नुकतीच शस्त्रक्रिया झालेल्या खोलींत जशी केव्हा केव्हा रक्तस्त्रावाची सूक्ष्म घाण येते, तशी घाण त्यांना एकदम आली.

— त्याबरोबर त्यांच्या अंगावर भीतीने काटा उभा राहिला.

पण त्यांनी मन घट्ट केलें आणि बटन् दाबून दिवा लावला.

तों त्यांना प्रयोगशाळेच्या एका कोपऱ्यांत असलेल्या लिहिण्याच्या प्रशस्त टेबलावर डॉ० अजित निजलेले दृष्टीस पडले.

म्हणून ते अगदी हळूच पुढे गेले.

मघाशी दार उघडल्याबरोबर आलेली रक्तस्त्रावाची सूक्ष्म घाण आता त्यांना जास्त जाणवली.

आपल्या पायांतल्या स्लीपरखाली कांहीतरी थंडगार द्रव पदार्थ असल्याचा संशय त्यांना आला.

त्यांनी खाली वाकून पाहिलें —

— तें रक्ताचें थारोळें होतें.

त्यांनी तत्क्षणींच टेबलाव[illegible]लोंबत असलेला दिवा लावला.

त्याबरोबर त्यांना दिसून आलें की, डॉ० अजित यांच्या मानेच्या दोन्ही बाजूंना चिरे दिलेले होते —